# इस्लाम

## गैरसमज, आक्षेप आणि निराकरण

लेखक
मुहम्मद जैनुल आबिदीन मंसुरी
अनुवादक
सय्यद जाकिर अली

# दोन शब्द

आपल्या देशामध्ये विभिन्न जाती, धर्म व विविध संप्रदायांचे लोक शतकानुशतकांपासून गुण्यागोविंदाने राहत आहेत. याबरोबरच काही ऐतिहासिक आणि राजकीय कारणांमुळे कधीकधी थोडेफार कटुतापूर्ण विरजन या संबंधांमध्ये पडले. विशेषत: मुस्लिम आणि बिगरमुस्लिमांतील या सलोखापूर्ण संबंधातच ही कटुता निर्माण झाली. मुस्लिम आणि बिगरमुस्लिम समुदायांदरम्यान असलेल्या वर्षानुवर्षांच्या या सलोखापूर्ण संबंधांवर मोठमोठे आघात झाले आणि यामध्ये मुस्लिम अथवा इस्लामच्या प्रति गैरसमजुती व भ्रमिष्टतांची विशेष भूमिका आहे. अर्थातच मुस्लिम आणि बिगरमुस्लिमांदरम्यान असलेल्या सलोखा आणि शांततापूर्ण नंदनवनात अज्ञान व अविश्वासाची विषारी व काटेरी झुडपे उगवत राहिली आणि वातावरण अक्षरश: रक्त ओकू लागले.

या परिस्थितीचे कारण काहीही असो, गैरसमजुती असोत, अज्ञानता व चुकीची माहिती असो अथवा इतर कोणतेही कारण असो, किंवा आरोप वा निराधार आक्षेपांचे दुर्भावनापूर्ण राजकारण असो, प्रत्येक परिस्थितीमध्ये आपल्या देशबांधवांच्या शंका-कुशंका आणि अडचणींचे योग्य समाधान करणे हे भारतीय मुस्लिमांचे परम कर्तव्य आहे. भारतीय मुस्लिमांचे हे आद्य कर्तव्य आहे की आपल्या देशबांधवांच्या मनातील इस्लाम व मुस्लिमांविषयीच्या शंकाकुशंका, आरोप वा आक्षेपांचे प्रामाणिकपणे निवारण करून इस्लामची खरी आणि पारदर्शक प्रतिमा सादर करावी. शिवाय हे परम कर्तव्य पार पाडण्याचे कारणही परिस्थितीच्या दबावाखाली अथवा सांप्रदायिक कूटनीतीअंतर्गत पार पाडायचे, अशातला भाग नसून मुळात इस्लामनेच अशी ताकीदपूर्ण शिकवण दिली आहे की मुस्लिम समुदाय समस्त मानवजातीच्या हित आणि कल्याणासाठी ईश्वरामार्फत या भूतलावर निर्माण करण्यात आला आहे. याच इस्लामी विचारसरणीनुसार मुस्लिमांची ही जबाबदारी आहे की सत्यधर्म अर्थात इस्लामच्या पारदर्शक प्रतिमेवरील शंकाकुशंका आणि आक्षेप व आरोपांची साचलेली मलिनता स्वच्छ करून त्याच्या वास्तविक प्रतिमेचे देशबांधवांना खऱ्या अर्थाने दर्शन घडवावे. ही छोटीशी पुस्तिका याच पुण्य हेतूने लिहून आपल्या प्रिय देशबांधवांच्या सेवेत सादर करीत आहे. ईश्वराच्या दरबारी प्रार्थना आहे की माझा हा हेतू पूर्ण होण्यात या छोट्याशा पुस्तिकेचे योगदान सफल व्हावे! (तथास्तु)

आपला एक देशबंधू
**मुहम्मद ज़ैनुल आबेदीन**
नवी दिल्ली

मार्च २०१०.

*पहिला आक्षेप ०००*

## तलाक : स्त्रीवरील अत्याचार?

**इस्लाममध्ये तलाक देण्याची जी पद्धत आहे ती वैयक्तिकरित्या पत्नीवर आणि सामाजिक स्तरावर स्त्रीजातीवर घोर अन्याय व अत्याचाराची भयानक कुऱ्हाड आहे. तसे पाहता व्यापक क्षेत्रात ही बाब लैंगिक समानतेच्यासुद्धा विरूद्ध आहे. कारण इस्लामने तलाक देण्याचा अधिकार केवळ पुरुषालाच दिलेला असून स्त्री बिचारी या अधिकारापासून वंचित आहे. म्हणून एकूणरित्या तलाक अर्थात इस्लामी घटस्फोटाच्या या पद्धतीमध्ये स्त्री-अधिकाराची मुस्कटदाबी करण्यात आली आहे.**

*समाधान ०००*

वस्तुत: इस्लाम ही एक परिपूर्ण जीवनव्यवस्था आहे. यामध्ये व्यक्तिगत, वैवाहिक, दांपत्यिक, कौटुंबिक व सामाजिकरित्या समस्त पैलू, तसेच त्यातील वैचारिक, आध्यात्मिक, नैतिक, भावनात्मक, आर्थिक, कायद्यात्मक व न्यायिक बाबींचा परस्पर अविभाज्य स्वरूपात गाढ व आंतरिक संबंध आहे. यामध्ये असणारा हा संबंध इतका घनिष्ट आहे की जीवनाचा कोणताही विशेष भाग अथवा अंश, पक्ष व अंग समग्रतेपासून विभक्त करून साधा विचार करणेदेखील शक्य नाही. जणू एका समग्र शरीराची एखाद्या छोट्याशा अवयवाव्यतिरिक्त कल्पना करणेही शक्य नसते, तशातलाच हा भाग होय.

वर मांडण्यात आलेला आक्षेप हादेखील मुळात एक समग्र असलेल्या बाबीपासून त्याचा एक भाग अथवा एखादे अंग वेगळे करून पाहण्यामुळेच निर्माण झालेला अथवा घेण्यात आलेला आहे. शिवाय काही तत्त्वांची इस्लाम व मुस्लिमांप्रती असलेली भूमिका वा नीतीसुद्धा कारणीभूत आहे. अर्थात इस्लाम व मुस्लिमांप्रते दुराग्रह, तिरस्कार, घृणा, विरोध आणि दुष्प्रचाराचे राजकारण काही तत्त्व करीत असतात व यामुळे अशा प्रकारचा आक्षेप वा आरोप होणे या तिरस्कार व दुष्प्रचाराच्या नीतीला बळी पडलेल्या भाबड्या देशबांधवांच्या मनात निर्माण होणे स्वाभाविक आहे. आणखीन एक कारण असे की स्वत: मुस्लिम समाजातच काही अज्ञानी लोक कुरआनाच्या शिकवणी व नियमांनुसार तलाक पद्धतीचा वापर करीत नसल्यामुळे स्त्रीवर अन्याय व अत्याचार होताना दिसतो. त्यांच्या या अज्ञानी व कुरआनाच्या शिकवणीविरूद्ध असलेल्या दुष्कृत्यामुळे स्त्रीजातीशी सहानुभूती बाळगणारे काही अज्ञानी बिगरमुस्लिम असा निष्कर्ष काढतात की या अन्याय आणि अत्याचारास इस्लामी विधानच जबाबदार आहे. ते या कुकृत्यासाठी इस्लामलाच दोषी ठरवितात. याशिवाय मुस्लिम समाजामध्ये आढळणाऱ्या या व्यावहारिक दोष अथवा त्रुटीचे कारण हेसुद्धा आहे की आपल्या देशामध्ये मुस्लिम समाजाची उभारणी इस्लामी शासनव्यवस्थेच्या अंतर्गत झालेल्या समाजाच्या उभारणीमुळे अथवा या व्यवस्थेअंतर्गत असलेल्या समाजातील प्रत्येक मुस्लिमाचे जीवन व प्रत्येक पैलू समग्र जीवनपद्धतीच्या अत्यंत मजबूत, पवित्र व न्यायपूर्ण दोऱ्यात ओवलेले असते. या

न्यायपूर्ण जीवनमालेत कोणत्याही पत्नीवर दुष्ट पतीच्या अत्याचाराला मुळीच वाव नसतो. तसेच उदंड आणि अवज्ञाकारी पत्नींकडूनसुद्धा पतीचे शोषण होत नसते. (या ठिकाणी मुद्दाम ही बाब वाचकांसमोर ठेवणे आवश्यक समजतो की मागील काही काळापासून आपल्या देशात बऱ्याच पत्नीपीडित पतींच्या संघटनासुद्धा कार्यरत असून जुलै २००९ मध्ये राजधानी दिल्लीत अशा संघटनांचे हजारो पत्नीपीडित सभासद एकत्र आले होते.)

## तलाक : एक अत्यंत घृणास्पद कर्म

इस्लाममध्ये धर्मसंमत आणि निषिद्ध असे दोन प्रकार कर्मांचे नेमून देण्यात आलेले आहेत. पैकी तलाक देणे हे वैध कर्म असूनही इस्लामने यास अत्यंत घृणास्पद व अवांछनीय कर्म ठरविलेले आहे. वैध असलेले प्रत्येक कर्म चांगले, उत्तम आणि निषिद्ध असलेले प्रत्येक कर्म इस्लामच्या दृष्टिकोनात घृणास्पद आहे, हा इस्लामचा अबाधित व अपरिवर्तनीय नियम आहे. मात्र तलाक देण्याचे कर्म वैध असूनही ते इस्लामने अत्यंत वाईट आणि घृणास्पद ठरविले आहे, हे विशेष!

पती-पत्नीतील प्रेमपूर्ण संबंध जेव्हा परस्पर द्वेष आणि तिरस्कारात बदलतात, या तिरस्कारपूर्ण संबंधामुळे जेव्हा दोघा पती-पत्नीचे वैवाहिक जीवन जेव्हा नरक बनते, कुटुंब आणि समाजासाठी जेव्हा हे संबंध अभिशाप बनते, पती-पत्नी जेव्हा सोबत राहूच शकत नाहीत व त्यांचे संबंध तिरस्कारांची परिसीमा गाठतात, तेव्हा या दोघांना विभक्त करून स्वतंत्ररित्या आपापल्या पसंतीने जीवनसाथी निवडण्याचे स्वातंत्र्य मिळण्यासाठी तलाकची उपाययोजना इस्लामने प्रदान केली. इस्लामला हे मुळीच पसंत नाही की पती-पत्नीचे दररोज खटके उडावेत, दररोज दोघांच्या शिवीगाळ आणि मारझोडीमुळे घरातले वातावरण दूषित होऊन मुलाबाळांवर वाईट संस्कार पडावेत अथवा हे संबंध पराकोटीस पोचून पती-पत्नीपैकी कोणाला आत्महत्या वा आत्मदहन करण्याची पाळी यावी किंवा पती-पत्नीपैकी कोणीही एकाने दुसऱ्याची हत्या करावी, पतीने घरदारसोडून निघून जावे किंवा पत्नीला घरातून हाकलून द्यावे, केवळ पती-पत्नीचे वैवाहिक जीवनच नव्हे तर समाजाला या कलह आणि द्वेषाच्या तीव्र आगीत होरपळावे लागावे, त्यापेक्षा पती-पत्नीने पूर्णत: एकमेकांपासून विभक्त होऊन आपापल्या मर्जीनुसार आपला जीवनसाथी निवडून पुढील जीवनाची वाटचाल सुरू केलेलीच बरी. म्हणूनच अशा नरकपूर्ण जीवनासाठी योग्य उपाय म्हणून इस्लाममध्ये तलाकचे प्रावधान अथवा उपाययोजना सुचविण्यात आलेली आहे. जणू हे अशा प्रकारच्या क्लेशदायक जीवनासाठी मोठे वरदानच म्हणावे लागेल. पत्नीने पतीच्या हातून प्रताडित व अपमानित होण्यापेक्षा दररोजच्या कटकटीतून मुक्त झालेले बरे. शिवाय पतीलाही पत्नीच्या शोषणपूर्ण व्यवहारातून सुटका मिळण्याचेदेखील हे साधन होय. अर्थातच अगदी शेवटचा पर्याय म्हणून आणि पुढील जीवन सुखशांती व समाधानाने जगता यावे म्हणून ही सुविधा इस्लामने पुरविली आहे. इस्लामवर आक्षेप ठेवणाऱ्या अथवा चिखलफेक करणाऱ्यांनी यावर अवश्य विचार करावा की पती-पत्नीचे वैवाहिक संबंध जेव्हा पराकोटीस पोचतात, त्यासाठी त्यांच्याकडे कोणता योग्य आणि न्यायपूर्ण पर्याय आहे. भारतीय परंपरेत तलाक अथवा घटस्फोटाची

योग्य पद्धत नसल्यामुळे आज असंख्य कुटुंबे उद्ध्वस्त होत आहेत. समाज या उद्ध्वस्ततेच्या आगीत पार होपरपळून निघत आहे. मुलाबाळांच्या मानसिकतेवर याचे अत्यंत विपरीत व विषारी परिणाम होत आहेत. मुलांना आईवडिलांचे प्रेम मिळत नाही. पत्नीला पती नाही आणि पतीला पत्नीचे प्रेम नाही. जीवनाचा कौटुंबिक अर्थच हरवून गेलेला असतो. याकरिता पतीनेही सुखाने जगावे आणि बिचाऱ्या पत्नीलाही सुखाने व समाधानाने जगता यावे म्हणून इस्लामने ही तलाकची पद्धत सुचविली आहे.

## दोन अतिवता

आपल्या देशात प्राचीन संस्कृती आणि धार्मिक परंपरेत घटस्फोटाची कल्पनादेखील नव्हती. स्त्रीने लग्न करून पतीच्या घरी जावे आणि मग तेथूनच तिची अंतिम यात्रा निघावी, अशीच आपल्या देशातील प्राचीन परंपरा होय. दाम्पत्यिक जीवन हे कितीही असामान्य कुंठित, समस्याग्रस्त जरी झाले, पती-पत्नीच्या संबंधात कितीही कटुता जरी आली, दोघांसाठी वैवाहिक संबंध अभिषाप जरी ठरले, दोघेही एकमेकांवर अन्याय, अत्याचार जरी करीत असतील, एकमेकांचा अपमान जरी करीत असतील आणि नैतिक अपराधांनी परिसीमा जरी गाठली असेल तरी कोणत्याही परिस्थितीत दोघांनी तसेच तडफडावे, मात्र विभक्त होऊ नये, अशीच येथील प्राचीन परंपरा होय. आजच्या लोकशाही कायदा व्यवस्थेच्या पूर्वी आपल्या देशात हीच परिस्थिती होती. दुसरीकडे पाश्चात्य संस्कृतीदेखील अत्यंत विचित्र परिस्तितीत वावरत आहे. या आधुनिक म्हणविल्या जाणाऱ्या संस्कृतीत तलाक अर्थात घटस्फोट देणे वा घेणे (कोर्टाच्या माध्यमाने) अगदी पोरखेळच झाला आहे. अगदी थोड्या-थोड्या बाबींवर आणि अगदी क्षुल्लक कारणावरून पती-पत्नीचे संबंधविच्छेद होत असतात. परिणामी मुलांना आणि पूर्ण समाजालाच 'सिंगल पॅरेंट फॅमिली'चे असह्य भोग भोगावे लागत आहेत. परिस्थिती इतकी शिगेला पोचली की काहीजण दरवेळेस कपडे बदलावे तसे पती-पत्नी बदलत असतात. आज हा पती तर उद्या ती बायको, अशी विचित्र आणि विलक्षण परिस्थिती पाहायला मिळते.

## संतुलित व मध्यममार्ग

भारतीय संस्कृतीच्या प्राचीन परंपरेचे एक टोक आणि पाश्चात्य संस्कृतीचे दुसरे टोक, या दोन्ही टोकांच्या परिस्थितीदरम्यान इस्लामने एक अत्यंत संतुलित आणि मध्यममार्गाचा अवलंब केला आहे. यामध्ये भारतीय परंपरेनुसार घटस्फोट अगदीच वर्ज्य, निषिद्ध, अवैध आणि असंभव तर नाहीच, शिवाय पाश्चात्य संस्कृतीप्रमाणे पोरखेळसुद्धा नाही. विशेषत: उपरोक्त दोन्ही प्रकारांमध्ये स्त्रियांवर जो अत्याचार आणि बहुपक्षीय शोषण होते, तेच मुळात आक्षेपार्ह आहे. याउलट स्त्री-पुरुषांच्या मानसिक आणि नैसर्गिक गरजांचा विशेष आदर करून तलाकची सुविधा निश्चितच कौटुंबिक व सामाजिक जीवनासाठी एक उपयुक्त व आवश्यक बाब आहे.

कोण म्हणतो की पत्नीला पतीपासून विभक्त होण्याचा अधिकार इस्लामने हिरावून घेतला आहे? अत्यंत असह्य आणि टोकाच्या परिस्थितीत ज्या ठिकाणी इस्लामने पतीला

तलाक देण्याचा अधिकार दिला आहे, त्याचप्रमाणे स्त्री अर्थात पत्नीसुद्धा विधिवत प्रक्रियेद्वारे नियमानुसार असह्य झालेल्या पतीपासून आपली सुटका करून घेण्यासाठी तलाक (घटस्फोट) घेऊ शकते. ही प्रक्रिया शरियतने अर्थात इस्लामी विधीने ठरवून दिली आहे. एवढे मात्र निश्चित की स्त्रीला स्वत:हून आपल्या पतीस तलाक देण्याचा अधिकार इस्लामने दिला नसला तरी एक सर्वस्वीकृत तथ्य यामागे आहे आणि ते तथ्य असे की स्त्री ही आपल्या स्वभाव आणि मनोवृत्ती, मानसिकता व भावूकतेमध्ये पुरुषांपेक्षा अगदीच भिन्न होय. येथे ही बाब मुळीच विसरता कामा नये की तिची भावनात्मक स्थिती अथवा स्वभाव खूपच नाजुक असल्यामुळे ती लवकरच अत्यंत भावूक होत असते. तिच्या हसऱ्या डोळ्यांमध्ये क्षणातच अश्रूही आपल्याला पाहावयास मिळतात. क्षणातच एखादी ढसाढसा व मुसमुसून रडणारी स्त्री खळखळून हसतानाही आपण पाहतो. तात्काळ रागावण्याचा आणि लागलीच आनंदी होण्याचा स्वभाव स्त्रीजातीतच आपल्याला पाहायला मिळतो. ज्या प्रतिकूल आणि कठीण व असह्य परिस्थितीत पुरुष हा त्याच्या कणखर आणि संयमी स्वभावामुळे एखाद्या कारणास्तव तलाक देणे व स्त्रीला आपल्या वैवाहिक जीवनातून कायमची हकालपट्टी करण्यापासून स्वत:ला रोखू शकतो आणि नकळत अनर्थ होण्यापासून आपला व आपल्या पत्नीचा बचाव करू शकतो, आत्मसंयम आणि आत्मनियंत्रणाद्वारे दांपत्यिक जीवन उद्ध्वस्त होण्यापासून रोखू शकतो, स्त्री मात्र अशा कोणत्याही परिस्थितीत स्वत:स रोखू शकत नाही. कारण पुरुषाप्रमाणे तिच्यात आत्मबल नसते, स्वनियंत्रणशक्ती नसते, क्रौर्य आणि भावनेच्या भरात ती अगदी क्षुल्लक कारणावरूनसुद्धा पतीला तलाक देऊ शकते. याची जीवित उदाहरणे आपल्याला पाश्चात्य देशांत मिळतात. आपल्या पसंतीचे टीव्हीवर चॅनल पाहण्याचा आग्रह करणाऱ्या पत्नीने पतीच्या हातून रिमोट कंट्रोल न मिळताच चिडून जाऊन पतीला तलाक दिला. बाजूला झोपलेल्या पतीच्या घोरण्याच्या आवाजावर रागावून पत्नीने त्यास तलाक देऊन टाकला. बायको बॉयफ्रेंडबरोबर फिरायला गेली नि पतीने तिच्या या वागण्यावर हलकासा आक्षेप घेतला की पत्नी त्यावर रागावली आणि या रागाच्या भरातच तात्काळ तलाक देऊन मोकळी झाली. पतीच्या एखाद्या गोष्टीमुळे वा त्याच्या एखाद्या व्यवहारामुळे अत्याधिक दु:खी, कष्टी व अपमानित होऊन अथवा घरगुती भांडणात भावूक होऊन मागचा-पुढचा कोणताही विचार न करता, होणाऱ्या परिणामाची जाणीव न ठेवता (पतीद्वारे तलाक देण्याच्या तुलनेत) पत्नीकडून तलाक देण्याची संभावना खूपच जास्त असते. म्हणून इस्लामने स्त्रीला पतीपासून तलाक घेण्याचा अधिकार असला तरी तलाक देण्याचा अधिकार दिलेला नाही. पत्नीस जर पतीकडून तलाक अथवा घटस्फोट घ्यायचा असेल तर या प्रक्रियेमध्ये इस्लामने आणखीन काही समजुतदार व जबाबदार लोकांना मध्यस्थी करण्याचासुद्धा आदेश दिला असून विधीनुसार काही दिवस तिची समजूत घालण्याची प्रक्रिया सुरू ठेवल्यानंतर जेव्हा त्यांना विश्वास होतो की संबंधविच्छेद होण्यातच स्त्रीचे भले होऊ शकते व हीच बाब न्यायसंमत आहे, तेव्हा पतीकडून तिला तलाक मिळवून देऊन मुक्त करण्यात येते. या प्रक्रियेस इस्लामी कायद्यात 'खुलअ' म्हटले जाते.

## घटस्फोटित स्त्रीप्रति सहानुभूती

तलाकवर आक्षेप घेण्याचे एक सकारात्मक कारणसुद्धा आहे ते असे की काहींना घटस्फोटित स्त्रियांचा खूप कळवळा असतो. मात्र या कनवाळूंना इस्लामच्या पारिवारिक आणि सामाजिक व्यवस्थेविषयी माहिती नसते. म्हणून त्यांना वाटते की अशा घटस्फोटित अबला स्त्रीला कोणताही सहारा नसतो, तिचा कोणी वाली नसतो, तिला कसलाही आधार नसतो आणि म्हणून ही बिचारी घटस्फोटित निराधार स्त्री अन्याय, अत्याचार, प्रताडना आणि हरप्रकारच्या शोषणाला बळी पडते, जीवनाच्या अत्यंत कठीण रस्त्यावर पावलोपावली ठेचकाळत असते. अर्थातच तलाक म्हणजे स्त्रीजातीवर एकप्रकारे घोर अन्यायच आहे. मात्र ज्यांनी इस्लामच्या कौटुंबिक आणि सामाजिक व्यवस्थेचा अभ्यास केलेला असतो, मुळात त्यांच्यासमोरच तलाक अर्थात घटस्फोटाची प्रतिमा असते. अन्यथा त्यांनी जर अभ्यास केला असता तर त्यांना हे निश्चितच समजले असते की इस्लामने अन्याय केला नसून केवळ न्यायाची स्थापना करण्यासाठीच इस्लामचे अस्तित्व आहे. तलाकच्या स्वरूपात कुटुंब आणि समाजात इस्लामने न्याय आणि शांतीचीच प्रस्थापना केली आहे. स्त्रीला निराधार, अबला आणि एकाकी सोडून दारोदार ठेचाळत फिरणे हे इस्लामच्या न्यायप्रणालीविरूद्ध आहे. तलाक दिल्यानंतर या स्त्रीच्या आधाराकरिता बऱ्याच तजवीजी इस्लाममध्ये आहेत, त्या आपण क्रमाक्रमाने या ठिकाणी पाहू या!

१) विवाहाच्या वेळीच पत्नीला पतीकडून महर (स्त्रीधन) ची एक विशेष रक्कम इस्लाम मिळवून देतो. ही रक्कम तिच्या एकटीच्याच मालकीची असून तिच्या या रकमेवर पती, दीर, सासू व सासरा आणि इतर कोणाचाही मुळीच अधिकार नसतो. एखाद्या कठीण आणि प्रतिकूल परिस्थितीत अथवा तलाकप्रसंगी ही रक्कम तिच्या कामी येते.

२) दांपत्यिक जीवनात पतीकडून मिळणाऱ्या भेटवस्तू, दागदागिने, इतर प्रकारच्या संपत्ती ही सगळी केवळ तिचीच असते.

३) तलाक अथवा घटस्फोट झाल्यावर स्त्री आपल्या माहेरी येते आणि तिच्या आईवडिलांवर अथवा आई-वडील नसल्यास तिच्या भावंडांवर तिच्या संगोपनाची जबाबदारी असते. म्हणून ती निराधार आणि अनाथ होण्याचा प्रश्नच निर्माण होत नाही.

४) तलाक अथवा घटस्फोट झाल्यावर स्त्री आपल्या माहेरी आल्यावर ती पुनर्विवाहाचा विचार करू शकते. योग्य स्थळ पाहून दुसरे लग्न करू शकते आणि याचा तिला इस्लामने पूर्णत: अधिकार दिला आहे. तिचा हा अधिकार कोणीही हिरावून घेऊ शकत नाही. तिला दुसरे लग्न करून सुखाने जगण्याच्या अधिकारात कोणीही मुळीच किंचितही अडचण निर्माण करू शकत नाही. एवढेच नव्हे तर माहेरच्या सगळ्याजणांचे हे परमकर्तव्यच आहे की त्यांनी तिच्यासाठी योग्य स्थळ पाहून लग्न लावून द्यावे. मग अशा व्यवस्थेमुळे घटस्फोटित स्त्री निराधार असण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही.

५) आपल्या मृत आईवडिलांच्या संपत्तीमध्ये स्त्रीचा एक निर्धारित वाटा इस्लामने ठरवून

दिला आहे. आईवडिलांनी मृत्यूपश्चात सोडलेली संपत्ती, घरदार, दुकान, कारखाना, शेती, पैसा, सोने, चांदी व इतर सर्वच प्रकारच्या संपत्तीमध्ये मुलीचा अर्थात स्त्रीचा एक विशेष वाटा असल्याचे कुरआनात (४:११, १२ व १७६) सविस्तरपणे म्हटले आहे. स्त्रीच्या आईवडिलांच्या संपत्तीत निर्धारित करण्यात आलेला वाटा म्हणजे अल्लाहनेच स्वयं निर्धारित केलेली सीमा असल्याचे म्हटले आणि या सीमेचे उल्लंघन करणे अर्थात स्त्रीला तिचा निर्धारित वाटा न देणे म्हणजे नरकाग्नीत जाणे होय, असेही कुरआनात (४:१४) म्हटले आहे. यावरून इस्लामने स्त्री अधिकारपूर्ती किती गंभीरपणे घेतले हे स्पष्ट होते. याव्यतिरिक्त भावंडे आणि इतर नातलगांच्या संपत्तीमध्येदेखील तिचा वाटा इस्लामने निर्धारित करून दिला आहे. संपत्तीमधील स्त्रीचा हा वारसाहक्क तिने लग्न केले तरी मिळणार आणि अविवाहित असली तरी मिळणारच.

६) आपण सर्वसाधारणपणे समाजात पाहतो की घटस्फोटित स्त्रीशी विवाह करण्याकरिता कोणीही अविवाहित तरुण सहसा तयार नसतो, हा मानवी स्वभावच आहे. मानवाची हीच मानसिकता लक्षात घेऊन इस्लामने बहुपत्नीत्वाची परवानगी दिली, जेणेकरून समाजातील विधवा आणि घटस्फोटित स्त्रियांशी लोकांनी दुसरा (व अतिविशिष्ट परिस्थितीत तिसरा आणि चौथा) विवाह करून त्यांना कायमची छत्रछाया द्यावी.

इस्लामने प्रदान केलेल्या या समस्त सुविधांवर दृष्टी टाकल्यास हा प्रश्नच मुळात उद्‌भवत नाही की तलाक अर्थात घटस्फोट हे स्त्रीकरिता अत्याचार आणि अभिशाप असतो. ही बाब निराळी आहे की मुस्लिम समाजातील काही अज्ञानी व असुशिक्षित लोकांच्या अज्ञानी कृत्यांमुळे काही बाबतीत तलाक देण्यात आलेल्या स्त्रीला जीवनात अडीअडचणी येताना दिसतात. मात्र पारलौकिक जीवनात आपल्या कर्माचा जाब देण्याची जाणीव, इस्लामी नीतीमत्ता आणि कुटुंब अथवा समाजाच्या दबावामुळे अशा घटस्फोटित स्त्रियांना निश्चितच कोणतीही अडचण येणार नाही. शिवाय इस्लामी नियमांचे पालन करणाऱ्या समाजात तर केवळ विधवा आणि घटस्फोटित स्त्रीच नव्हे तर कुठल्याही अबालवृद्धावर अन्याय व अत्याचाराचा प्रश्नच निर्माण होत नाही, हे दाहीदिशा सत्य आहे. दुसरीकडे मुस्लिम समाजामध्ये इस्लामच्या नीतीनियमांची शिकवण, प्रसार व प्रचारकार्य सतत सुरू असते. या आधारावरच समाजसुधारणेचे कार्य जोमाने सुरू असते. यामुळे अज्ञानाचा आलेख आपोआपच खाली येतो आणि समाजामध्ये इस्लामी नीतीमत्ता वाढीस लागते. परिणामी घटस्फोटित स्त्रीची तेवढी दुर्दशा मुस्लिम समाजात कोठेच पाहावयास मिळत नाही, जेवढा गाजावाजा करण्यात येत असतो. तलाकमुळे स्त्रीची जी दुर्दशा होण्याचे बुजगावणे विरोधक आणि इस्लामद्वेष्ट्यांनी उभे केले आहे, तेवढी आजही मुस्लिम समाजात कोणत्याही ठिकाणी पाहायला मिळत नाही. कारण इस्लामने घटस्फोटित स्त्रीच्या केवळ भौतिक गरजाच नव्हे तर मानसिक व आध्यात्मिक गरजासुद्धा पूर्ण केल्या आहेत. घटस्फोटित स्त्रीचाही इस्लामने इतर स्त्रियांप्रमाणेच जबरदस्त मान-सन्मान केला आहे. तिलाही इतर स्त्रियांप्रमाणेच समाजात समान दर्जा प्रदान केला आहे.

उपरोक्त समस्त प्रकारचे प्रावधान इस्लामने सुचविल्यामुळे घटस्फोट झाला काय आणि ती विधवा झाली काय, तिला समाजात पूर्ण मान-सन्मान आणि ताठ मानेने जगण्याची संधी असल्याने तिचे कोणत्याही प्रकारे शोषण होणे शक्यच नाही. तिच्या शीलतेवर साधी चिकलफेक करण्याची हिंमतदेखील कोणाला होणार नाही. तिच्याकडे समाजात कोणीही दुर्लक्ष करणे शक्य नाही. तिला धिक्कारण्याचे समाजात कोणीही धाडस करू शकणार नाही. तिचा तिरस्कार करण्याची हिंमत कोणासही होणार नाही.

इस्लामला बदनाम करण्याचा आणि साध्या व भाबड्या देशबांधवांच्या मनात इस्लामविषयी तिरस्कार निर्माण करण्याचाच एक कुटिल डाव देशातील काही तत्त्व करीत असतात, हेच यावरून सिद्ध होते. मात्र जागृत देशबांधवांनी कोणाच्याही डावाला बळी न पडता आणि कोणाच्याही भूमिकेचे अंधानुकरण न करता कुरआनचा स्वत:हून अभ्यास अवश्य करावा आणि स्वत:च निर्णय घ्यावा.

*दुसरा आक्षेप ...*

## बहुपत्नीत्व - स्त्रीवरील अत्याचार?

**इस्लाममध्ये बहुपत्नीत्वाची अर्थात चार-चार पत्नीं करण्याची प्रथा असून हे नारीचे शोषण आणि तिच्याप्रति दुर्व्यवहार व अत्याचार आहे. विशेषत: भारतासारख्या प्रचंड लोकसंख्येच्या देशात मुख्यत्वे मुस्लिम लोक कित्येक पत्नीं करतात आणि आपली लोकसंख्या वाढवून प्रचंड लोकसंख्येच्या संकटास खतपाणी तर घालतातच शिवाय काही वर्षांतच लोकसंख्या इतरांपेक्षा जास्त वाढवून ते भारताची सत्तासूत्रे हाती घेऊ इच्छितात.**

*समाधान ...*

सर्वप्रथम ही बाब लक्षात घेणे आवश्यक आहे की ईशधर्म मानव इतिहासाच्या विविध चरणांत, विविध भूभागांतील वेगवेगळ्या जाती व राष्ट्रांमार्फत विकसित व प्रदूषित होत होत तसेच वारंवार पैगंबरांच्या आगमनाद्वारे सुधारप्रक्रिया होत होत जवळपास १४०० वर्षांपूर्वी जेव्हा इस्लामच्या रूपात प्रकट झाला, त्या काळी बहुपत्नीत्व विभिन्न रूपांत जगातील जवळपास प्रत्येक समाज आणि संस्कृतीत प्रचलित होते. एवढेच नव्हे तर स्वयं हिंदू समाजातील अत्यंत महत्त्वपूर्ण, महान, आदरणीय विभूती आणि महापुरुषांच्या कित्येक पत्नीं आणि राण्यांचा उल्लेख धर्मग्रंथांत आहे. इस्लामचे आगमन झालेल्या अरब समाजातसुद्धा बहुपत्नीत्वाची प्रथा होती आणि पत्नींच्या संख्येवर कोणत्याही प्रकारची मर्यादा नव्हती. मात्र इस्लामने त्या ठिकाणी पत्नींच्या संख्येवर नियंत्रण आणले आणि चारपेक्षा जास्त पत्नींची परवानगी नाकारली. अशा प्रकारे इस्लामने बहुपत्नीत्वाच्या प्रथेची सुरूवात केली नसून उलट त्यावर मर्यादा व नियंत्रण आणले.

### बहुपत्नीत्वाची परवानगी

इस्लामने मुळात अशी परवानगी दिली आहे की वैयक्तिक, सामाजिक अथवा नैतिक स्तरावर बहुपत्नीत्व-विवाह हा स्त्री, पुरुष, परिवार तसेच समाजासाठी लाभदायक असेल अथवा अशी एखादी विशेष परिस्थिती उद्भवली असेल तर पुरुषाने आपल्या ऐपतीनुसार दोन, तीन किंवा जास्तीतजास्त चार स्त्रियांशी विवाह करावा. मात्र ही परवानगी सशर्त आहे, अटी लागू आहेत. पतीने आपल्या सर्व पत्नींशी समान व न्यायपूर्ण व्यवहार करावा. जर असे करणे शक्य नसेल आणि समानता व न्यायपूर्ण व्यवहार करण्याची पुरुषामध्ये जर पात्रता नसेल तर इस्लामचा स्पष्ट आदेश आहे की केवळ एकाच पत्नीबरोबर वैवाहिक जीवनाचा उपभोग घ्यावा.

तब्बल दीड हजार वर्षांपासून आजतागायत प्रत्येक देशातील आणि आपल्या भारतातीलसुद्धा मुस्लिम समाज याच नियमाचे अगदी काटेकोरपणे पालन करीत आहे. पुढील मजकुरात आपण हे पाहणारच आहोत की जर सामान्य परिस्थितीत मुस्लिम समाजासहित

इतर कोणत्याही समाजात बहुपत्नीत्वाची प्रथा नाही तर मग अशा कोणत्या विशेष परिस्थितींमध्ये बहुपत्नीत्वाची गरज भासू शकते? याचे कोणते फायदे आहेत आणि ही प्रथा बंद केल्यास अथवा निषिद्ध ठरविल्यास कोणते नुकसान समाज व देशाला भोगावे लागतात, त्याचप्रमाणे बहुपत्नीत्वाची प्रथा बेकायदेशीर व अवैध घोषित केल्याने तसेच हिचा मार्ग बंद केल्याने स्त्री-पुरुष, संतती, परिवार, समाज आणि व्यवस्थेवर कोणते कुप्रभाव पडतात, हेच आपण या ठिकाणी पाहणार आहोत.

## विविध प्रकारच्या परिस्थिती

**परिस्थिती क्र. १ :** एखाद्या कारणामुळे पत्नीला मूलबाळ होत नसेल वा ती वांझ असेल किंवा गर्भधारणेची तिच्यात शारीरिक क्षमता नसेल अथवा एखादा विशिष्ट आजार जडलेला असेल अथवा पिता होण्याच्या व आपला वंश वाढविण्याच्या निसर्गदत्त इच्छेची मुस्कटदाबी होत असेल.

**परिस्थिती क्र. २ :** पत्नीस एखादा असा लैंगिक रोग जडलेला असेल, ज्यामुळे चिकित्सा विशेषज्ञांनी पतीस तिच्याशी शरीरसंबंध करण्याची मनाई केलेली असेल, अशा कठीण प्रसंगी पतीला आपल्या लैंगिक भावना आवरणे शक्य नसेल.

**परिस्थिती क्र. ३ :** एखाद्या विधवा अथवा घटस्फोटित महिलेस आधार नसेल, तिला बिचारीला मानसिक, भावनात्मक, कौटुंबिक, सामाजिक, आर्थिक, नैतिक व चारित्र्यिक तसेच सहज कामेच्छापूर्तीत बाधा, असुरक्षितता, अपमान व शोषण आणि असंतुष्टता वगैरेसारख्या संकटांचा सामना करावा लागत असेल किंवा अशी प्रबळ संभावना असेल. कोणीही अविवाहित तरुण तिच्याशी लग्न करण्यासाठी तयार नसेल (हे एक सामाजिक कटूसत्य आहे) आणि तिला आई-वडील व भावंडे तसेच इतर कोणाचाही आधार नसेल.

**परिस्थिती क्र. ४ :** एखाद्या विधवेस अथवा घटस्फोटितेस लहान-लहान मुले असतील आणि मुलांचे अनाथपण व आपले वैधव्य असे दोन्ही भोग भोगण्यास ती अबला असमर्थ असेल, तिला आई-वडील व भावंडे तसेच इतर कोणाचाही आधार नसेल.

**परिस्थिती क्र. ५ :** एखादे युद्ध अथवा महायुद्ध झाले आणि त्यात इतके सैनिक अथवा पुरुष ठार झाले की अविवाहित अथवा विधवा स्त्रियांची संख्या जीवित पुरुषांच्या प्रमाणात खूप जास्त झाली असेल.

**परिस्थिती क्र. ६ :** पुरुषामध्ये कामवासना इतकी जास्त झालेली असेल की एका पत्नीने त्याचे समाधान होत नसेल व त्यास स्वत:च्या कामवासनेवर नियंत्रण ठेवणे अशक्य होत असेल आणि कामवासनेच्या प्रभावामुळे धार्मिक संवेदनशीलता, नीतीमत्ता, सामाजिक परंपरा तसेच आचारसंहितेच्या मर्यादा तोडण्याची भीती असेल.

उपरोक्त सहा विविध परिस्थितींत इस्लामने बहुपत्नीत्वाची परवानगी दिलेली आहे आणि या सहा परिस्थितींवर हाच एक सर्वोत्तम उपाय आहे. याव्यतिरिक्त आपण हेदेखील पाहू या की अशा या खडतर व समाजविघातक परिस्थितींमध्ये बिगरइस्लामी उपाय कोणते

आहेत आणि इस्लामी उपाय व बिगरइस्लामी उपायांची तुलना करून आपण हेसुद्धा पाहू की अशा बिकट परिस्थितीत इस्लामने सादर केलेला बहुपत्नीत्वाचा उपाय हा स्त्रीवर अन्याय आणि अत्याचार आहे की वरदान अथवा सुरक्षितता व सन्मान आहे.

## बिगरइस्लामी उपाय

वर उल्लेखण्यात आलेल्या सहा प्रकारच्या विभिन्न परिस्थितींत जो उपाय आहे, तो एकपत्नीत्वाचा होय. याचे पती-पत्नीच्या, कुटुंबाच्या जीवनावर तसेच समाजावर काय परिणाम होतात, त्याचा लेखाजोखा घेऊ या.

१) पत्नी, कुटुंब, समाज आणि इतरांच्या भीतीने त्यांना माहिती न होऊ देता पती दुसरे लग्न करतो. दुसऱ्या शब्दांत सर्वांशीच दगाबाजी करतो, कायदा धाब्यावर बसवितो. दुसऱ्या पत्नीला सांभाळण्यासाठी, तिला वेळ देण्यासाठी, तिच्यावर पैसे खर्च करण्यासाठी आपल्या पहिल्या पत्नीला खोटे बोलतो, तिचा विश्वास भंग करतो, या सर्व तडजोडी आणि तंटेबखेडे सांभाळता न आल्यास बिचाऱ्या पहिल्या निष्पाप पत्नीपासून सुटका करून घेण्यासाठी एखाद्या अनैतिक आणि अपराधी मार्गाचा अवलंब करतो. कधी पत्नीचा खून करू शकतो, कधी आत्महत्याही करू शकतो वा इतर कोणताही अपराध करू शकतो.

२) पत्नीला एखादा असा रोग जडला असेल की तिच्याशी समागम करणे शक्य होत नसेल आणि नवऱ्याच्या लैंगिक भावनांची मुस्कटदाबी होत असेल, कामवासनेवर नियंत्रण ठेवणे अशक्य होत असेल (ही बाब अशक्यच आहे) तर एकपत्नीत्वाच्या प्रथेमध्ये हा पती अनैतिकरित्या आपल्या वासनांची आग विझविण्यासाठी लपून छपून परनारीशी संबंध ठेवील. अनाचार व व्यभिचारास कोणत्याही प्रकारची मर्यादा नसते. लैंगिक तृष्णेने पिसाटलेल्या नागाप्रमाणे तो समाजातील अनेक स्त्रियांच्या पावित्र्याला डसून विष ओकत असतो. त्यास समाजातील स्त्रियांच्या पावित्र्य व शीलतेची मुळीच पर्वा नसते आणि परिणामी समाजातील स्त्रियांचे लैंगिक शोषण सुरू होते व थांबता थांबत नाही. कित्येक लैंगिक दुराचार होत असतात आणि सहसहमतीने होणाऱ्या यौनाचाराच्या (Consensual Sex) तार्किक आधारावर कायदा व प्रशासनाची कोणतीही पकड नाही. पहिल्या पत्नीच्या अधिकारांची यामुळे किती राखरांगोळी होते, तिच्या भावना व अधिकारांची कशी होळी होत असते, याची मुळीच काळजी नाही. दुसऱ्या शब्दांत या एकपत्नीत्वाच्या प्रथेमध्ये पुरुषाने केवळ एकच लग्न करावे आणि नैतिकता व अधिकारांची सर्रास राखरांगोळी करून कित्येक गर्लफ्रेन्ड्स, मित्र आणि रखेल्यांशी लैंगिक संबंध प्रस्थापित करून व्यभिचार करावा, पुरुषत्वाचा तोरा मिरवावा आणि आपल्या कामवासनेच्या देवतेसमोर पहिल्या पत्नीच्या अधिकारांचा बळी द्यावा. शहराशहरांत आणि गावागावांत वेश्यालये चालू असावीत, लैंगिकतेचा बाजार मांडावा, नारीच्या पावित्र्याची लक्तरे वेशीला टांगण्यात यावी, तिची खरेदी-विक्री व्हावी, हेसुद्धा एकपत्नीत्वाच्या प्रथेत योग्यच समजले जाते. पतीने वाटेल तेथे तोंड मारावे, वाटेल तसे पावसाळ्यातील कुत्रीप्रमाणे तोंड काळे करीत राहावे, समाजातील कित्येक तरुणी आणि स्त्रियांच्या इभ्रतीचा सर्रास बळी घ्यावा, हे सर्व

चालते, मात्र वैधरित्या आणि कायदेशीररित्या दुसऱ्या स्त्रीशी लग्न करून घरात आणणे हे 'स्त्रीवर अघोरी अत्याचार' करणे, महापाप करणे आणि स्त्रियांच्या अधिकारांचे हनन करणे ठरविण्यात यावे. अथवा पहिल्या पत्नीच्या कटकटीपासून कायमची मुक्ती घेणेसुद्धा आवश्यक ठरते. नसता दुसरा विवाह करणे शक्य नसते. ही मुक्ती अथवा तिच्यापासून सुटका घेण्यासाठी घटस्फोटाचा मार्गसुद्धा सोयिस्कर ठरू शकतो आणि कायद्याच्या लांबलचक आणि कंटाळवाण्या प्रक्रियेचा वैताग येऊन बिचाऱ्या त्या निरपराध पत्नीचाच कायमचा काटा काढण्यात येतो. सकाळी वर्तमानपत्रात बातमी येते की दिवा अंगावर पडून एक स्त्री शंभर टक्के भाजून मृत्यू पावली अथवा अमक्याने पत्नीचा खून केला, पत्नीने स्वत:स जाळून घेतले अथवा आत्महत्या केली.

३) पूर्वीच्या काळात सतीची प्रथा होती. आता कायद्याने विधवेस या उपायापासून वंचित केले आहे. मात्र कायद्याने ही प्रथा बंद केली असली तरी विधवेकरिता पर्यायी असलेली ठोस आणि प्रभावकारी उपाययोजना सुचविली नाही व कायदा यासाठी पूर्णत: हतबल असल्यामुळे त्याने विधवेची जबाबदारी कुटुंब आणि समाजावर टाकून बगला उंचावल्या. या निरपराध व निष्पाप आणि अबला स्त्रीला आपल्या बांगड्या फोडून, आपल्या कपाळावरील सौभाग्याचे कुंकू पुसून, आपला साजशृंगार फेकून देऊन, वैधव्याचे लक्षण असलेली पांढरी साडी नेसून ननंद, भावजयी आणि सासूचा सतत धिक्कार व अपमान सहन करून, परिवारातील प्रत्येक सदस्याची गुलामगिरी करून व पायाखालची दासी बनून या निरपराध व निष्पाप आणि अबला विधवेला जीवनाचे असह्य भोग भोगावे लागतात. समाजात तिला ना दुसरे लग्न करण्याची परवानगी आहे ना एखद्या इतर पुरुषाला तिच्याशी लग्न करून बिचाऱ्या या दु:खी-कष्टी निराधार अबलेस आधार देण्याच्या सहानुभूतीपूर्ण कामाची परवानगी आहे. (शिवाय कायद्यानेसुद्धा याची परवानगी दिलेली नाही.) म्हणून या विधवेस समाजाने नाना प्रकारचे शारीरिक, मानसिक शोषण, अपमान व निंदानालस्ती, धिक्कार व तिरस्कार सहन करण्यासाठी सोडून द्यावे अथवा खूपच दया आली तर एखाद्या विधवा आश्रमात तिला सोडून द्यावे. ही वेगळी गोष्ट आहे की काही विधवा आश्रमात विधवांचा सुनियोजित देहव्यापारही चालतो.

४) तिसऱ्या क्रमांकाच्या परिस्थितीत अर्थात निराधार विधवेस कोणत्याही प्रकारचा आधार नसताना एवढाच पर्यायी उपाय सुचविण्यात आला व यानुसार विधवांच्या अनाथ मुलांना अनाथालयात फेकून देण्यात येते. या अनाथालयात नीतीमत्ता, ईशपरायणता यासारख्या बाबींचा पूर्णत: अभाव असल्यामुळे सतत अनाथांवर अन्याय व अत्याचार होत असतात. त्यांचे शोषण थांबता थांबत नाही. विधवा आईपासून दुरावलेली अनाथ मुले माता-पित्यांच्या नैसर्गिक प्रेम आणि सहानुभूतीस मुकतात.

५) उपरोल्लेखित पाचव्या क्रमांकाची परिस्थिती उद्भवली असल्यास इस्लामी उपाय अर्थात बहुपत्नीत्वाच्या उपायाचा अवलंब न केल्यास काळजाचा थरकाप उडविणाऱ्या परिस्थितीस समाजास सामोरे जावे लागते. या परिस्थितीवर नियंत्रण मिळविण्यासाठी एकपत्नीत्वाची पद्धत निश्चितच हतबल ठरते. युद्धामध्ये अथवा महायुद्धांत असंख्य पुरुष ठार होतात

आणि स्त्रियांची संख्या पुरुषांच्या प्रमाणात कितीतरी जास्त पटीने वाढते. अशा परिस्थितीत इतिहास साक्षी आहे की स्त्रिया आणि विधवा लोकांची सार्वजनिक मालमत्ता ठरते व याशिवाय स्त्रिया आणि विधवांसमोर इतर कोणताही पर्याय नसतोच मुळी. पहिल्या आणि दुसऱ्या महायुद्धातील परिस्थितीचा इतिहास आपण अनुभवलेलाच आहे.

६) या ठिकाणीसुद्धा क्रमांक दोनमधील उपायच योग्य आहे.

## इस्लामी उपाय

उपरोक्त समाजविघातक परिस्थितीत इस्लामने बहुपत्नीत्वाचा उपाय सूचित केला आहे. हाच उपाय स्त्रीच्या यौनसुरक्षेकरिता सर्वोत्तम उपाय आहे. शिवाय तिच्या भावनात्मक, मानसिक, शारीरिक, भौतिक, आर्थिक व सामाजिक सुरक्षिततेसाठी इस्लामी उपायाशिवाय इतर कोणताही पर्याय नाही. खरे पाहाता बहुपत्नीत्वाची ही पद्धत अबला नारीजातीवर एक जबरदस्त उपकारच आहे. या उपकारास अत्याचार, शोषण आणि अपमानासारख्या उपाधी देणे म्हणजे बौद्धिक दिवाळखोरीच म्हणावी लागेल. यापेक्षाही जास्त असे की बहुपत्नीत्वाची ही इस्लामी पद्धत स्वत: पतीच्या चारित्र्य, शीलता, सज्जनता व सदाचाराकरिता तसेच नैतिक अस्तित्वाकरिता एक पर्वणी व शुभतंत्रच आहे. या पद्धतीमुळे विधवांपासून ते अनाथांपर्यंतच्या समस्त अडचणी आपोआपच नाहीशा होतात आणि समाजाची नैतिक अधोगती होण्याची साधी कल्पना करणेसुद्धा शक्य नसते.

एखाद्या मोठ्या युद्धामध्ये किंवा महायुद्धामध्ये प्रचंड नरसंहार होतो. असंख्य पुरुष ठार होतात. बाकीच्या जीवित उरलेल्या पुरुषांपेक्षा कितीतरी पटीने स्त्रियांची संख्या वाढते. लक्षावधी स्त्रिया विधवा होतात अशा परिस्थितीमध्ये बिगरइस्लामी संस्कृतीचा इतिहास पाहिल्यास हेच दृश्य समोर येते की अशा स्त्रिया सार्वजनिक संपत्ती झाल्या. याशिवाय समाज आणि व्यवस्थेसमोर इतर कोणताही पर्याय अथवा विकल्प नव्हता. इस्लामने अशा असामान्य आणि आपात्कालीन परिस्थितीत बहुपत्नीत्वाचा उपाय खुला ठेवून निराधार विधवांचे सामाजिक, आर्थिक, लैंगिक आणि मानसिक शोषणापासून पूर्णत: रक्षण केले.

## बहुपत्नीत्व आणि लोकसंख्यावृद्धी

मुस्लिम लोक चार-चार बायका करतात. रात्रंदिवस केवळ इतकाच त्यांना उद्योग असतो की आपली लोकसंख्या भरमसाठ वाढवावी. मात्र एवढेही लक्षात येऊ नये की कोणत्याही इतर समाजाप्रमाणे मुस्लिम समाजाचीसुद्धा सामान्य व्यावहारिक व वास्तविक परिस्थिती या गोष्टीचे खंडन करते की ते चार-चार बायका करतात. कारण याकरिता मुस्लिम समाजामध्ये स्त्रियांची संख्या पुरुषांच्या तुलनेत चारपटीने अधिक असणे आवश्यक आहे. तसेच प्रत्येक व्यक्तीमध्ये चार-चार पत्नींच्या वैयक्तिक गरजा पूर्ण करण्याची तसेच त्यांचे पालनपोषण करण्याची ऐपत नसते.

शिवाय ही बाबसुद्धा धादांत खोटी आहे की मुस्लिम व बिगरमुस्लिम मुलांच्या लोकसंख्यावाढीचे प्रमाण ४:१ असे आहे. लोकसंख्येच्या सर्वेक्षणावरून स्पष्ट होते की

गेल्या ६० वर्षांपासून मुस्लिमांची एकूण लोकसंख्या देशाच्या पूर्ण लोकसंख्येच्या केवळ दहा ते तेरा टक्केच आहे. दुसरीकडे मागील ३० वर्षांपासून काही तथाकथित समाजतज्ञ एका विशिष्ट मानसिकतेसह वारंवार लोकांची दिशाभूल करून देशबांधवांच्या मनात मुस्लिमांविषयी भयगंड निर्माण करण्याचा उद्योग वा कारस्थान करीत आहेत. ते बिगरमुस्लिम देशबांधवांना सर्रासपणे आक्रस्तळेपणाने सांगत सुटले आहेत की पुढील २० ते ३० वर्षांच्या काळात मुस्लिमांची संख्या बिगरमुस्लिमांच्या बरोबरीला येईल आणि देशाची सत्तासूत्रे तेच हस्तगत करतील. आपण मात्र हात चोळीत तसेच बसू. २५ मुस्लिम १०० महिलांशी लग्न करून ५०० मुले जन्माला घालतील आणि 'हम पाँच हमारे पच्चीस' या इस्लामी फॉर्म्युल्यानुसार अवघ्या २० ते ३० वर्षांत उदंड झालेले लिंगपिसाट मुस्लिम भारताची सत्ता हाती घेतील. मात्र ३० वर्षांपासून करण्यात येत असलेली ही विलक्षण भविष्यवाणी आजही पूर्ण झालेली नाही, हे आश्चर्यच. आता आणखीन किती ३० वर्षे पाहिजेत हे त्यांनाच माहीत. कोणत्याही समजुतदार माणसाने सद्सद्विवेकबुद्धीने विचार केल्यास त्याच्या निश्चितच लक्षात आल्याशिवाय राहणार नाही की मुस्लिम आणि इस्लामविरुद्ध कांगावा करण्यामागे अथवा गरळ ओकून भाबड्या देशबांधवांना विनाकारण भयभीत करण्यामागे कोणत्या स्वरूपाचे राजकारण आणि कुटिल डाव आहे.

*तिसरा आक्षेप*

## पडदा पद्धती : स्त्रीवरील अत्याचार?

**या सृष्टीमध्ये असलेले विलोभनीय, मनोरम व मनमोहक सौंदर्य हे मुळात मानवजातीच्या आनंद व मनोरंजनासाठीच आहे. ही गोष्ट स्त्रीसौंदर्यावरदेखील लागू होते. मात्र इस्लामने सृष्टीच्या या अद्‌भूत व आकर्षक सौंदर्यावर पडदा टाकून मानवप्रकृतीवर घोर अन्याय केला तसेच नारीच्या सौंदर्यप्रदर्शनावर पहारे बसवून सभ्यता आणि संस्कृतीवर तसेच नारीवरदेखील अत्याचार केला. याबरोबरच या पडदा पद्धतीमुळे स्त्री-पुरुष समानतेचा विरोध होऊन नारी अधिकारांची पायमल्ली होते. प्रगती आणि विकासाच्या मार्गात इस्लामने पडदा पद्धतीच्या माध्यमाने भलताच मोठा अडसर निर्माण केला आहे. यामुळे स्त्रीला प्रगतीच्या मार्गावर वाटचाल करणे अशक्य झालेले आहे. आज पुरुषाच्या खांद्याला खांदा लावून यशाच्या क्षितिजावर भरारी मारण्याची पात्रता असणाऱ्या स्त्रीवर इस्लामने किती घोर अत्याचार केला आहे!**

*समाधान ०००*

### लज्जा - निसर्गदत्त मानवी गुणधर्म

सहा ते सात वर्षांच्या वयामध्ये मुला-मुलींत नैसर्गिकरित्या आपले शरीरांग आणि विशिष्ट अवयव लपविण्याची भावना निर्माण होते. यासाठी त्यांना आई-वडील, वडीलधारीजन आणि इतर कोणीही शिक्षा-दीक्षा तसेच उपदेश वगैरे देण्याची गरज नाही. ही लाज-शरमेची प्रवृत्ती सहाव्या-सातव्या वर्षी आपोआपच नैसर्गिकरित्या मुलांत निर्माण होत असते. खरे पाहता ही प्रवृत्ती स्त्री-पुरुषात उत्पन्न करणे अथवा त्यात वृद्धी करण्याचे कार्य स्वत: प्रकृतीद्वारे (इस्लामी विचारसरणीनुसार स्वयं मनुष्य व सृष्टीच्या निर्मात्या ईश्वराकडून) संपन्न करण्यात येते. ही प्रवृत्ती अर्थात लाज-शरमेचा विशेष गुणधर्म मानवाशिवाय इतर कोणत्याही सजीवात अथवा प्राण्यात आढळून येत नाही. शरीराचे गुप्त अवयव लपविण्याकरिता मानव कपड्यांचा वापर करतो, मात्र पशु-पक्षी त्यांची गुप्तांगे लपवित नसतात. लाज आणि शरमेचे हे व्यापक आणि नैसर्गिक (Universal and Natural) प्रावधान विशेष स्वरूपात मानवाकरिता असल्याचे एवढेच कारण आहे की त्यांच्याकडे (अर्थात स्त्री-पुरुषाकडे) शील व इभ्रतीची इतकी बहुमोल संपत्ती असते, जी अन्य सजीव अथवा पशु-पक्ष्यांत नसते. याच संपत्तीच्या रक्षणाकरिता मानवास लाज आणि शरमेची प्रवृत्ती निसर्गाने प्रदान केली आहे. काही कारणांमुळे (ज्यांत प्रमुख कारण कुरआनात २४:२१ आणि ७:२० च्या अनुसार सैतानातर्फे असलेली प्रेरणा होय.) हा शरमेचा गुणधर्म जेवढा दुर्बल आणि विकृत व प्रदूषित होत जातो, माणसाचे आणि विशेषत: स्त्रीचे शील तेवढ्याच प्रमाणात नष्ट होत जाते. हा रोजचाच अनुभव आहे.

ही वस्तुस्थिती सामान्यत: सर्वविदित आहे की पुरुषांच्या तुलनेत स्त्रियांमध्ये लाज-

शरमेचे प्रमाण जास्त असते. अगदी किशोरावस्थेतच हा फरक स्पष्टपणे जाणवू लागतो. वयात येण्यापूर्वीपासून म्हणजेच किशोरावस्थेपासूनच मुलीचे हावभाव, शरीर लपविण्याची अदा व अंदाज, तिचे लाजाळूपण, चालण्या-बोलण्याचा बायकीपणा वगैरे मुलांपेक्षा भिन्न दिसू लागतो. नर-नारीतील हा फरक एक सर्वस्वीकृत तथ्य असून नारीचे शील पुरुषाच्या तुलनेत जास्त मौल्यवान तर असतेच शिवाय ते अत्यंत संवेदनशील आणि सूक्ष्मग्राही असते. अगदी हलकासा धक्का लागताच ते भंग होते.

जी वस्तू जेवढी संवेदनशील असते ती तितकीच जपून वापरावी लागते, असा एक सामान्य नियम आहे. स्त्रीची अब्रू आणि शीलता हीदेखील काचेपेक्षाही जास्त व अत्यंत नाजुक अशी बहुमूल्य वस्तू असल्याकारणाने इस्लामने पडदा पद्धतीच्या माध्यमाने स्त्रीच्या लज्जेचे रक्षण आणि याच्या माध्यमाने तिच्या शीलतेचे पूर्णत: संरक्षण करण्याची जबरदस्त व्यवस्था केली आहे. ही बहुमूल्य संपत्ती अतिशय संवेदनशील असल्यामुळे खूपच जपून आणि सांभाळून वापरावी असे कुरआनात २४:३०,३१ मध्ये सूचित करण्यात आले आहे. म्हणून हे एक ठोस सत्य आणि वास्तविकता आहे की ज्या स्त्रिया जास्त पडदा पद्धतीचा अवलंब करतात (अर्थात देहप्रदर्शन करीत नाहीत), त्या निश्चितच इतरांपेक्षा जास्त शीलवान असल्याचे आपण स्वत: आपल्या डोळ्यांनी पाहतो. जर आपल्या देशातील आणि सगळ्या जगातील सर्व स्त्रियांनी पडदा पद्धतीचा अवलंब केला अथवा 'इस्लामिक ड्रेस कोड'चा अवलंब केला तर निश्चितच कोट्यवधींच्या संख्येत होणाऱ्या लैंगिक अत्याचारांना, शोषण व लैंगिक अपराधांना आपोआपच आळा बसून ५५ टक्क्यांनी हा आलेख खाली घसरेल.

## इस्लामची पडदा पद्धत

इस्लामने मानवाच्या बुद्धी आणि चेतनावस्थेस प्रत्यक्षात अपील करीत प्रत्येक व्यवहार, प्रत्येक प्रकरण आणि प्रत्येक मुद्द्यावर निष्ठापूर्वक व गांभीर्याने विचार करण्याचे उघड व स्पष्ट आवाहन केले आहे. इस्लामचे एक वैशिष्ट्य हेसुद्धा आहे की त्याने जीवनाच्या कोणत्याही पैलूत, कोणत्याही क्षेत्रात व्यक्ती, समाज आणि सभ्यता व संस्कृती केवळ विवेक, अंतरात्मा आणि चेतनशक्तीवरच आधारीत न ठेवता अथवा त्याच्या केवळ शिकवणी व उपदेशांपर्यंतच ठेवले नसून जीवनासंबंधी प्रत्येक बाबतीत नियम, कायदा आणि आदेशसुद्धा प्रदान केले आहेत. कारण विभिन्न आंतरिक आणि बाह्यात्मक कारणांच्या सतत सक्रियतेमुळे नेहमीच मूळ मानवी प्रवृत्तीमध्ये विकार व बिघाड येणे साहजिक असते आणि याच्या प्रभाव व प्रबलतेमुळे मानव आपल्या मूळ प्रवृत्तीपासून बाजूला सरकतो, त्यास त्याच्या आंतरात्म्यातून येणारी साद तुच्छ वाटू लागते व तो तिची अवहेलना करतो. एवढेच नव्हे तर तो आपल्या स्वभावगुणधर्मांशी बंड पुकारतो. स्त्रियांनी वस्त्रहीन व नग्न होऊन देहप्रदर्शन करणे अथवा त्यांना देहप्रदर्शनासाठी अर्धनग्नावस्थेत वा पूर्णनग्नावस्थेत अश्लील रूपात येण्यासाठी पुरुषांद्वारे प्रेरित करणे, चिथावणी देणे हे प्रकृतीशी बंड पुकारण्याचेच द्योतक आहे.

पडदा पद्धतीवर इस्लामच्या भूमिकेवर विचार करण्यापूर्वी स्त्रिया सोडून वस्त्रहीन

होऊन नाइट क्लब आणि डिस्कॉथेक्स (Discotheques) मध्ये नृत्य करणाऱ्या किंवा जवळपास पूर्ण नग्न होऊन सौंदर्यस्पर्धेत आणि रॅम्पवर कॅटवॉकच्या फॅशन शोमध्ये भाग घेणाऱ्या किंवा ब्ल्यू फिल्ममध्ये आपले यौनक्रियारत शरीर बिनधास्तपणे दाखविणाऱ्या; कोणत्याही एखाद्या सामान्य स्त्रीला जर विचारण्यात आले की "बाईसाहेब! तुम्ही साडी, सलवार सूट, शर्ट, ओढणी नेसून आपले यौनांग व लैंगिक अवयव कपड्याखाली झाकून वा कपड्यांत गुंडाळून का ठेवता? आपल्या अद्‌भूत, आकर्षक व मनमोहक सौंदर्य आणि यौवनाने पुरुषांचे मनोरंजन का होऊ देत नाही? त्यांना आनंदीत केले तर काय बिघडेल? कशाला घालता या सुंदर शरीरावर कपडे?" याव्यतिरिक्त इस्लामवर आक्षेप घेण्यापूर्वी प्रथम हा प्रश्न स्वत: आपली मुलगी, बहीण, माता आणि पत्नीला विचारावा. (कारण प्रत्येक स्त्री कोणाची मुलगी, कोणाची बहीण, कोणाची माता तर कोणाची पत्नी असते) तर या प्रश्नाचे साहजीकच दोन अथवा दोनपैकी एक उत्तर मिळेल ते याप्रमाणे- पहिले उत्तर असे की "कदाचित तुम्हाला वेड लागले वा तुमच्या बुद्धीचे दिवाळे निघाले. कारण इतकी सोपी गोष्टही तुमच्या बुद्धीत येत नाही, इतकी साधारण गोष्ट की मानवाच्या उत्पत्तीपासून प्रत्येक काळ, प्रत्येक भूभाग, प्रत्येक जात आणि राष्ट्राच्या कोणत्याही स्त्री-पुरुषास आजपर्यंत ही गोष्ट समजावून सांगण्याची गरज भासली नाही." दुसरे उत्तर असे की "आमची लाज-लज्जा, आमचे नारीत्व, आमचा गौरव आणि शीलता व इभ्रतीचे रक्षण (Protection and Preservation of Chastity) करण्यासाठी असलेली आमची प्रबळ नैसर्गिक व मौलिक प्रवृत्ती आम्हाला आपले यौनांग व लैंगिक अवयवांना कपड्यांत झाकून ठेवण्यासाठी दक्ष व तत्पर ठेवते. ही आमची अत्यंत मौलिक गरज आहे."

## पडदा पद्धतीचे इस्लामी उद्दिष्ट व तत्त्वदर्शिता

इस्लामने ज्याअर्थी पडदा पद्धतीचा कायदा करून तो अनिवार्य ठरविला त्याअर्थी त्यामागील उद्दिष्ट आणि मानवतेचे हितसुद्धा स्पष्ट केले आहे. कुरआनात मुस्लिम स्त्रियांना पडदा पद्धतीचा आदेश देण्याबरोबरच यामागील उद्दिष्ट अशा प्रकारे स्पष्ट केले आहे की, "जेणेकरून त्यांना ओळखता यावे आणि त्यांचा छळ होता कामा नये." (३३:५९)

तसे पाहाता ही दिसायला अत्यंत साधारण बाब आहे, मात्र वस्तुत: यामध्ये एक जबरदस्त उद्दिष्ट आणि तत्त्वदर्शिता व्यापलेली आहे.

कुरआनच्या या आयतीमध्ये "त्यांना ओळखता यावे" या वाक्याचा भावार्थ असा आहे, समाजातील चारित्र्यहीन लोकांना कळून चुकावे की या सुशील स्त्रिया आहेत. यांच्याकडून कोणत्याही प्रकारे अनैतिक प्रकारच्या यौन-अग्रेसरता आणि सहकार्याची अपेक्षा तर सोडाच, साधी कल्पनादेखील कोणी करता कामा नये.

"आणि त्यांचा छळ होता कामा नये." या वाक्याचा भावार्थ असा आहे, जास्त तंग कपडे, अभद्र पोषाख, अश्लील अर्धनग्न आणि उद्दिपित करणाऱ्या पोषाखांचा वापर करणाऱ्या आणि इतरांमध्ये आपल्याप्रति लैंगिक भावना जागविणाऱ्या स्त्रियांना व युवतींना पाहून पुरुषांमध्ये

लैंगिक उत्तेजनांच्या तीव्र भावना निर्माण होतात आणि मग ते त्यांची छेड काढतात, शील वाजवितात, शारीरिक अत्याचार, अपहरण, बलात्कार, सामूहिक बलात्कार, बलात्कारानंतर हत्या व यासारख्या नाना अपराधांच्या तीव्र आगीत स्त्रीच्या मर्यादा व तिचे नारीत्व जळून खाक होऊ लागते. या संपूर्ण विदारक आणि अपमानास्पद व आत्म्याचा थरकाप उडविणाऱ्या परिस्थितींपासून पडदाधारी स्त्रियांचे पूर्णत: रक्षण व्हावे, तिचा छळ आणि शोषण होऊ नये हे उद्दिष्ट आणि तत्त्व यामागे आहे.

## प्रगती आणि विकासात पडदा अडसर आहे काय?

पडदा पद्धतीचा विरोध करणाऱ्या महाभागांचा दुसरा तर्क असा आहे की स्त्रीने पडदा पद्धतीचा अवलंब केला की ती मुळीच प्रगती करू शकत नाही. घराच्या चार भिंतींमध्ये कैद्यासारखे जीवन कंठणारी, रात्रंदिवस स्वयंपाकघराच्या चुलीतच आपले सर्वस्व जाळून घेणारी, मुले जन्माला घालणारी मशीन असलेली शोषित, पीडित महिला समाज आणि राष्ट्राच्या प्रगतीमध्ये काय दिवा लावणार? निश्चितच घराच्या चार भिंतीत कोंबून ठेवण्यात आलेली पडदा पद्धतीत गुंडाळून टाकलेली स्त्री सर्वांगीण विकासात आपले यथार्थ योगदान देण्याच्या संधीपासून वंचित असते आणि सर्व बाजुंनी तिच्या इच्छा-आकांक्षा व भावनांची मुस्कटदाबी होत असते. हा मुळात इस्लामचा भारी दोष व मोठाच अत्याचारपूर्ण दुर्गुण आहे.

या मोठ्या शक्तिशाली व तर्कपूर्ण आक्षेपाचे इस्लामने अत्यंत सरळ, स्पष्ट आणि रोखठोक उत्तर दिले ते याप्रमाणे- अशी प्रगती, असा विकास, अशी उन्नती, अशी संपन्नता जी स्त्रीच्या शीलत्व, लाज-लज्जा, गौरव, मानसन्मान आणि नारीत्वाची राखरांगोळी करून, तिचे सर्वस्व निर्दयीपणे पायाखाली चिरडून साधण्यात येते. मग त्यात कितीही भौतिक लकाकी आणि चमक का असेना. या प्रगती आणि विकासामध्ये पूर्णत: कधीही भरून न निघणारे नुकसानच आहे. या उन्नती, प्रगती व विकासाची जबर किंमत मोजावी लागणार आहे. प्रगती नावाच्या या होळीत तिचे सर्वस्व सती जाणार आहे. ज्या प्रगतीस नारी अधिकाराचा सुंदर मुखवटा चढवून समोर करण्यात येत आहे. त्यामागे मात्र नारीशोषण आणि तिच्या अधिकारांचा बळी घेणारे भयानक असूर लपलेले आहे.

पडदा पद्धतीविरोधात विरोधकांनी जे बुजगावणे उभे केले, ते मुळात लोकांची दिशाभूल करणारे आहे. पडदा पद्धतीमुळे शिक्षण, ज्ञान, शोध, संशोधन, व्यापार आणि इतर कोणत्याही क्षेत्रात काहीही अडचण येत नाही. पडदाधारी स्त्रिया अध्यापिका, शिक्षिका आणि डॉक्टर्सदेखील होतात. मुळात पडदा पद्धती अशा कोणत्याही विकास आणि प्रगतीमध्ये अडसर ठरत नाही, ज्या प्रगतीत त्यांना त्यांचे शीलत्व, नारीत्व आणि त्यांची प्राणप्रतिष्ठा गमावून बसावे लागत नाही.

## प्रगतीमध्ये स्त्रीचे योगदान व वास्तविकता

इस्लामने प्रगती आणि विकासाची खूप व्यापक आणि विस्तीर्ण व्याख्या दिली आहे

ती अशी- वास्तविक प्रगती आणि विकास म्हणजे अशी प्रगती, जिच्यात भौतिक विकासाबरोबरच आध्यात्मिक व नैतिक विकास साधण्यात यावा. सभ्यता आणि संस्कृतीमध्ये मानवी मूल्यांची संपूर्ण भूमिका आणि ज्ञान-विज्ञान व तांत्रिकतेच्या भूमिकेला संतुलित सामंजस्य, समन्वय व मानवजातीच्या विकासाचा आधार असावा. या पूर्ण प्रक्रियेत नारीशी संबंधित नैतिक मूल्यांना विशेष महत्त्व देण्यात आले आहे. याबाबतीत हे एक सर्वविदित व सर्वस्वीकृत सत्य आहे की नारीचे शरीर जेवढ्या प्रमाणात बेपडदा अर्थात नग्नावस्थेत सार्वजनिक प्रदर्शनास्तव खुल्या आणि स्वच्छंद समाजासमोर सादर करण्यात येईल, तेवढ्याच जास्त प्रमाणात तिच्या नैतिक मूल्यांचा ऱ्हास, पतन आणि शोषण होत राहाणार!

'वुमेन इन अ चेंजिंग सोसायटी' (प्रकाशन- १९९३) या एका शोधपुस्तिकेची प्रबुद्ध लेखिका पुस्तिकेच्या प्रारंभीच लिहिते,

''भारतामध्ये मुस्लिम शासनाची सुरूवात होताच पडदा पद्धतीची परंपरा सुरू झाली आणि स्त्रियांना घराच्या चार भिंतीआड कैद करून टाकण्यात आले. त्यांचे शिक्षण बंद झाले आणि 'बाहेरील जगात' त्यांची भूमिका अगदी नगण्य राहिली.''

मात्र या विद्वान लेखिकेने हे लिहिण्याची मुळीच तसदी घेतली नाही की मुस्लिम शासनकाळात 'बाहेरील जगात' (कार्यस्थानांवर) मुस्लिम स्त्रियांचे लैंगिक शोषण आणि बलात्कारांची संख्या किती होती? व्यभिचार, छेडछाड आणि विनयभंगाच्या घटना किती घडल्या होत्या? स्त्रियांचे अपहरण व बलात्कार आणि लैंगिक अपराधांसदर्भातील हत्यांचे प्रमाण किती होते? याचे केवळ एकच कारण लक्षात येते आणि ते असे की मुस्लिम शासनकाळात स्त्रियांची अशी दुर्दशा मुळीच झाली नाही (आणि नंतरच्या काळात आजपर्यंतसुद्धा मुस्लिम समाजामध्ये इतक्या जास्त प्रमाणात स्त्रीची दुर्दशा पाहावयास मिळत नाही.) आणि याचे खापर पूर्णपणे इस्लाम आणि त्याच्या पडदा पद्धतीच्या माथ्यावर फोडण्यात येत असल्यामुळे त्याचप्रमाणे प्रबुद्ध आणि विचारवंत(?) असलेल्या या लेखिकेला कदाचित काही अडचणी आल्यामुळे पडदा-प्रथा आणि घराच्या चार भिंतीच्या कैदेचे फायदे व चमत्कारांचा स्वीकार करण्याचे धारिष्ट्य तिला झाले नाही. म्हणूनच पडदा-प्रथा व चार भिंतींच्या कैदखान्यावर एक संक्षिप्त मात्र भारी नकारात्मक तसेच इस्लामच्या सामाजिक, नैतिक व्यवस्थेवर (अपमानकारक) टीका-टिप्पणी करण्यावरच समाधान मानले. मात्र तिने आधुनिक भारताच्या (घरच्या कैदेच्या चार भिंती तोडण्याचे शौर्य दाखवून बाहेरील स्वतंत्र जगात धाडसी भूमिका दाखविणाऱ्या) नारीसंबंधी १९८८, १९८९, १९९० सालातील काही घटनांचा पृष्ठ क्र. १४८ वर उल्लेख करून सत्य परिस्थिती किती विदारक आणि भयानक आहे, याचे वास्तव चित्र सादर करून वस्तुस्थितीचा अतिभयानक चेहरा समोर आणला आहे. (यामध्ये पडदा पद्धतीशी संबंधित इस्लामी नीतीनियम आणि इस्लामचा मानवसमाज तसेच नारीजातीस संबोधून (परोक्ष स्वरूपात) एक महत्त्वपूर्ण संदेशसुद्धा आहे. प्रबुद्ध लेखिकेने लिहिले आहे, (येथे मराठी अनुवाद देत आहोत-)

"आज बलात्कारासंबंधी सर्वेक्षणाच्या अहवालातून एका अत्यंत दु:खद परिस्थितीचे रहस्योदघाटन होते. भारतामध्ये दररोज सुमारे ३३ स्त्रियांबरोबर बलात्कार होतात, दरवर्षी २० हजार बलात्कार होतात. हिंदी भाषिक प्रदेशात (उत्तर प्रदेश, मध्य प्रदेश, राजस्थान, बिहार, छत्तीसगढ, झारखंड वगैरे) सन १९८८ मध्ये २६,३८५, सन १९८९ मध्ये ३०,३२०, सन १९९० मध्ये ३१,०१४ नारीशोषणाच्या घटना घडल्या. तसेच बिगरहिंदी भागांत हेच प्रमाण क्रमश: २२,२२४; २३,८५३; २३,८५३ असे आहे. ताज्या घटना व घडामोडींवरून लक्षात येते की पश्चिम बंगाल, त्रिपुरा आणि ओरिसासारख्या सुरक्षित राज्यांत बलात्कारांची मोठ्या संख्येत नोद झालेली आहे. 'मॅरी स्टोप्स, दिल्ली'नुसार भारतात दरवर्षी दोन कोटी स्त्रिया आणि मुलींवर बलात्कार होतो. तसेच केवळ पाच टक्केच याप्रकरणी गुन्हे दाखल होतात."

प्रगतीमध्ये नारीयोगदानाच्या सुखद प्रवासाच्या वर्षानुवर्षानंतर उपरोल्लेखित प्रमाणात आता किती वाढ झाली, याचा अंदाज लावणे काही अवघड काम नाही. तसे पाहता 'नॅशनल क्राइम रेकॉर्ड ब्यूरो' आणि इतरही अनेक संस्थांच्या माध्यमातून प्राप्त होणारे दरवर्षीचे सर्वेक्षण अहवाल नग्नता, अश्लीलता आणि पडदाविरोधी लैंगिक स्वैराचाराचे दुष्परिणाम अर्थात नारीदुर्दशा, प्रताडना, अपमान आणि शोषणाचे मनाचा थरकाप उडविणारे चित्र सादर करतात. जागरुक बुद्धी आणि संवेदनशील अंत:करण असेल तर ही सत्यपरिस्थिती पडदा पद्धतीच्या इस्लामी प्रथेवर उठणाऱ्या प्रश्नांचे सडेतोड उत्तर स्वत:च देते, पडदा पद्धतीवर करण्यात येणाऱ्या आक्रस्ताळेपणाच्या आरोप आणि गैरसमजुतींचे योग्य निवारण याच उपरोल्लेखित विदारक सत्य परिस्थितीतून मिळते. इतर कोणीही काही सांगायची गरजच मुळी नाही.

## चेहऱ्याचा पडदा

हे तथ्य अथवा वस्तुस्थिती कोणीही नाकारू शकत नाही की व्यभिचार व बलात्कार असो, तरुणी व महिलांचे छेड काढणे असो किंवा त्यांचे अपहरण व त्यांच्याशी दुष्कर्म करणे असो, या समस्त कुकर्माचा आरंभबिंदू चेहरा आहे. अर्थात चेहऱ्यापासूनच या समस्त अपराधी कर्मांची सुरूवात होते अथवा चेहरा यांचे मूळ प्रवेशद्वार आहे. शिवाय चेहऱ्यावर चांगला मेकअप करून परपुरुषांमध्ये कामोत्तेजना भडकाविण्यासाठी व त्यांना प्रलोभित करण्यासाठी चेहरा आकर्षक केला तर समजा ते प्रवेशद्वार उघडण्यात आले, नारीचे शील आणि तिचा गौरव संकट सागरात झोकून देण्यात आला.

इस्लामने स्त्रीचे नारीत्व, शील व सन्मान सुरक्षित ठेवण्याकरिता असा आदेश दिला आहे,

"तिने सामान्य परिस्थितीत घराबाहेर पडताना आपल्या शरीराबरोबर चेहरासुद्धा झाकावा."

(कुरआन-३३:५९)

त्याचप्रमाणे असामान्य परिस्थितीत व गरज असेल तरच आपला चेहरा परपुरुषाला दाखवावा. मात्र या ठिकाणीदेखील इस्लामने स्त्रीजातीची पूर्णत: काळजी घेतली आणि याकरिता

आदेश दिला की, ''परपुरुषांस अत्यंत गरजेच्या प्रसंगी चेहरा दाखवविताना योग्य ती काळजी घ्यावी.'' याच आदेशानुसार असे सूचित करण्यात आले की, कोणत्याही स्त्रीने (आपल्या पतीव्यतिरिक्त) कोणत्याही परपुरुषासमोर साजशृंगार व मेकअप करून आकर्षक आणि लैंगिक उत्तेजना निर्माण होण्यासारखी चेहऱ्यावर सजावट व हावभाव चढवून, चेहरा खुला ठेवून येता कामा नये. परपुरुषांसमोर येण्याची खूपच गरज पडली तर चेहऱ्यावर लैंगिक भावना भडकावणारे मेकअप आणि सजावट करून येऊ नये. हा महत्त्वपूर्ण उद्देश 'बुरखा' नावाच्या पोषाखामुळे व्यवस्थितरित्या पूर्ण होतो. याशिवाय स्त्रीचे केसदेखील पुरुषांना आकर्षित करतात आणि त्यांच्यात लैंगिक उत्तेजन निर्माण करू शकतात. म्हणून इस्लामने असासुद्धा आदेश दिला आहे की, ''चेहरा उघडण्याची गरज पडलीच तर केसांवर पडदा ठेवावा.'' अर्थात केसांना अवश्य झाकावे.

*चौथा आक्षेप ...*

# जिहाद - हिंसा, उपद्रव, आतंक?

**'जिहाद' हे हिंसा, हत्या, नरसंहार, रक्तपात, अशांती, अन्याय, अपराध आणि आतंकवाद होय. 'जिहादी' व्यक्ती एक क्रूर, निर्दयी, निष्ठूर आणि मानवतेचे रक्त सांडणारी व्यक्ती असते. 'जिहाद' हे मानवाधिकार आणि विश्वशांतीचा प्रथम क्रमांकाचा शत्रू आहे.**

*समाधान ...*

'जिहाद' हे त्या अनेक विषयांपैकी एक अत्यंत ज्वलंत आणि प्रमुख विषय आहे, ज्यांना इस्लामच्या स्वत:च्या सूत्रांच्या आधारे समजून घेण्याऐवजी इस्लाविरोधी आणि इस्लामद्वेष्ट्या सूत्रांच्या आणि माध्यमांच्या आधारे समजून घेण्याचा प्रयत्न होत आहे. म्हणून अशा अनुचित आणि असैद्धान्तिक प्रक्रियेच्या परिणामस्वरूपी इस्लाममध्ये 'जिहाद'विषयी जेवढे भयावह आणि घृणास्पद स्वरूप सादर करण्यात आले आहे, ते विशाल, सशक्त आणि व्यापक असलेल्या प्रसारमाध्यमांद्वारे जगाच्या जवळपास प्रत्येक व्यक्तीसमोर मांडण्यात आले आहे. परिणामस्वरूपी अज्ञानता, गैरसमजुती, घृणा व भयाच्या धरतीवर उपरोक्त आक्षेपाची काटेरी व विषारी झुडपे सर्वत्र फोफावली आहेत. मात्र एक गोष्ट प्रथमत: लक्षात अवश्य घ्यावी की कोणत्याही गोष्टीला तिच्या वास्तविकतेसह समजून घेण्यासाठी प्रसारमाध्यमे, नेते व राजकारण्यांची भाषणे ऐकून भागत नसते, तर स्वत: त्या वस्तूच्या मूळ रूपाशी संबंधित विश्वसनीय सूत्र समजून घेणे गरजेचे असते.

## 'जिहाद'चा अर्थ

या ठिकाणी आपण 'जिहाद'चा मूळ अर्थ काय आहे आणि राजकारण्यांनी व प्रसारमाध्यमांनी त्याचा कोणता अर्थ व कसे स्वरूप जगासमोर सादर केले, ते पाहू या.

'जिहाद' हा मुळात अरबी शब्द 'ज' 'ह' 'द' या मुळाक्षरांपासून तयार झाला आहे, त्यापासून तयार झालेल्या शब्दांचा (जे कुरआनात एकूण १७ आहेत आणि १९ अध्यायांत अर्थात सूरहमध्ये ४१ ठिकाणी प्रयुक्त आहे.) 'कठोर परिश्रम, संघर्ष, प्रयत्न व प्रयास' असा अर्थ आहे. ज्या अर्थाच्या 'जिहाद'वर आक्षेप घेण्यात येत आहे तो 'जिहाद'च्या (प्रयत्नाच्या, संघर्षाच्या) विभिन्न स्तर आणि चरणांपैकी असे अंतिम चरण आणि शिखरबिंदू आहे, जेथे सशस्त्र संघर्ष अनिवार्य होतो. अशा (युद्धस्वरूपी किंवा सामरिक) 'जिहाद'वर कुरआनच्या भाष्यकारांनी सविस्तरपणे इस्लामची भूमिका स्पष्ट केली आहे. त्याचप्रमाणे या विषयावर विविध भारतीय व विदेशी भाषांमध्ये पुरेसे साहित्यसुद्धा उपलब्ध आहे. उपरोक्त शंका-कुशंका आणि आक्षेपांचे वास्तविक उत्तर व निवारणासाठी या साहित्याचे अध्ययन सत्यनिष्ठतेने करणे आवश्यक आहे. या ठिकाणी थोडक्यात व कमीतकमी शब्दांत 'जिहाद'ची वास्तविकता स्पष्ट करण्यात येत आहे.

## 'जिहाद'ची संक्षिप्त व्याख्या

या ठिकाणी 'जिहाद'ची संक्षिप्त आणि स्पष्ट व्याख्या आम्ही सूज्ञ वाचकांच्या सेवेत सादर करीत आहोत, जेणेकरून 'जिहाद'विषयी त्यांची गैरसमजुत दूर व्हावी. ही व्याख्या याप्रमाणे आहे,

''अन्याय, अत्याचार आणि शोषण करणाऱ्या शक्ती, रक्तपात, नरसंहार करणाऱ्या आणि विध्वंस व उपद्रव माजविणाऱ्या शक्ती, दीनदलित आणि दुबळ्यांवर अत्याचार करणाऱ्या, त्यांना वसती आणि शहर, देश आणि समाजातून बाहेर निघून जाण्यास विवश करणाऱ्या शक्ती, हे सारे कुकृत्य या शक्ती सशस्त्र होऊन करीत असतील तर मुस्लिम समुदाय आणि मुस्लिम शासनाचे हे परमकर्तव्य आहे की सशस्त्र होऊन अशा जुलमी शक्तींचा सामना करावा, आपले रक्षण करावे. अत्याचार करणाऱ्यांची शक्ती व सामर्थ्य नष्ट करून शोषण तसेच अन्याय, अत्याचार, अशांती व उपद्रवाचा समूळ नायनाट करावा. सत्य व ईशपरायणता आणि न्याय व शांतीच्या शत्रुंना पराभूत करून सत्याची स्थापना करावी. सत्यमार्ग अर्थात शाश्वत ईशमार्ग प्रशस्त करावा, ज्यावर मार्गक्रमण करून मानवसमाज आणि मानवजाती इहलोक व परलोकात सहजगतीने यशस्वी व्हावी. या अत्याचाराचा समूळ नायनाट करतानादेखील सशस्त्र संघर्षात कोणत्याही प्रकारे शत्रूवरदेखील अन्याय व अत्याचार होता कामा नये याची पूर्णत: खबदारी बाळगण्यात यावी. या संघर्षात ईशआदेश, नियम आणि शिकवणींचे पूर्णत: पालन करण्यात यावे.''

ही इस्लामी 'जिहाद'ची स्पष्ट आणि थोडक्यात व्याख्या होय. अशा प्रकारचा 'जिहाद' कोणत्याही (विविध) नावांनी मानवजातीच्या दीर्घ इतिहासात पूर्वीपासूनच होत आला आहे. समस्त मानवांनीच सशस्त्र होत असलेल्या अन्याय व अत्याचारांसमोर निमूटपणे गुडघे टेकून आत्मसमर्पण केले असल्याचे मानवी इतिहासात कोठेही आढळत नाही. कारण असे होणे हे मूळ नैसर्गिक प्रवृत्तीच्या अगदी विरुद्ध आहे. मात्र इतिहासात प्रथमच इस्लाम धर्माला हे श्रेय प्राप्त आहे की त्याने 'जिहाद' करण्याचे नियम व आदेश नैतिक आणि वैधानिक या दोन्ही स्तरांवर पूर्णपणे निश्चित करून दिले आणि याबरोबरच ही बाब विश्वसनीय व आवश्यक ठरविली की अन्यायाचा प्रतिकार करतानासुद्धा अन्याय व अत्याचार मुळीच खपवून घेतले जाणार नाहीत. प्रतिशोधाच्या भावना इतक्या प्रबळ मुळीच होता कामा नये की न्याय, दयाशीलता आणि मानवतेचा विसर पडावा. (संदर्भ : कुरआन-५:८)

## 'जिहाद' आतंकवाद आहे काय?

ज्या ठिकाणी 'जिहाद' आतंकवाद असण्याचा मुद्दा उपस्थित होतो, त्या ठिकाणी ही बाब अवश्य लक्षात घ्यायला हवी की इस्लामचे पैगंबर मुहम्मद (स.) आणि त्यांचे अनुयायी हे सत्य धर्माच्या आवाहन व प्रसार-प्रचारकार्याबरोबरच विरोधकांच्या क्रूर, निष्ठूर व निर्दयी अन्याय व अत्याचारांच्या भयानक आगीत (स्वामी लक्ष्मीशंकराचार्य यांच्या 'इस्लाम आतंकवाद की आदर्श' या पुस्तिकेनुसार) तब्बल २३ वर्षांपर्यंत अक्षरश: होरपळत होते आणि या क्रूर

व निष्ठूर आतंकवादाचा सामना करीत होते. शेवटी २३ वर्षांच्या जीवघेण्या संघर्षानंतर विरोधकांचा हा आतंकवाद नष्ट करण्यात त्यांना पूर्णपणे यश मिळाले.

इस्लाममध्ये 'जिहाद' मुळात आतंकवाद, अन्याय-अत्याचाराचा समूळ नायनाट करण्याचा एक ईशमार्गदर्शित कर्म आणि प्रक्रिया आहे. या प्रक्रियेत अत्याचारी शक्ती जर आतंकित झाल्या किंवा 'जिहाद'लाच आतंकवादाचे नाव देऊन बदनाम केले तर ही बाब निश्चितच बुद्धिसंमत नाही. एका पाश्चिमात्य विचारवंताचे हे शब्द वस्तुस्थितीस तिच्या वस्तुनिष्ठ स्वरूपात अशा रितीने सादर करतात,

"Terrorism of the powerfull is called war, and war of the weak is called terrorism."

*अर्थात*- "शक्तिशालींनी माजविलेल्या आतंकवादास युद्ध म्हटले जाते आणि दुर्बलांनी केलेल्या युद्धास आतंकवाद ठरविण्यात येते."

*पाचवा आक्षेप ०००*

## 'काफिर' - जातीवाचक शिवी, अपमानास्पद शब्द?

**कुरआनात 'काफिर' शब्द हिंदूंसाठी वापरण्यात आला असून अत्यंत अपमानजनक आणि शिवी देण्यासारखा प्रयुक्त झालेला आहे. असे म्हटले गेले की या काफिरांना मारा-कापा. यामुळे भारतीय समाजात द्वेष, वैरभाव, तिरस्कार आणि असहिष्णुतेची अवस्था निर्माण झाली आहे.**

*समाधान ०००*

हा आक्षेप अगदी निराधार आणि बिनबुडाचा आहे. असे असते तर साऱ्या जगातील आणि प्रामुख्याने भारतातील अनेक मुस्लिमेतर विचारवंत, विद्वान आणि इतिहासकारांनी उपरोल्लेखित आक्षेपाविरूद्ध शेकडो व हजारो पृष्ठांवर आधारित पुस्तके लिहिलीच नसती. हा बिनबुडाचा आरोप व आक्षेप सामान्यत: अज्ञानता व अपूर्ण माहिती, त्याचप्रमाणे काही अंशी चुकीची माहिती व दुष्प्रचारामुळे असल्याचे स्पष्टपणे दिसून येते. आता आपण या आक्षेपाचे समाधान पुढील मजकुरात पाहू या.

### 'काफिर' शब्दाचा अर्थ

'काफिर' हा अरबी शब्द असून 'क' 'फ' 'र' या तीन मुळाक्षरांपासून तयार झालेला आहे. कुरआनमध्ये या मुळांपासून तयार झालेल्या ५४ शब्दांपैकी ५१ शब्द असून या सर्वच शब्दांचा अर्थ 'कुफ्र' असा आहे. 'कुफ्र' हे क्रियापद असून याचा कर्ता 'काफिर' हा शब्द आहे. म्हणजेच 'कुफ्र' करणारा 'काफिर' होय. 'कुफ्र' या क्रियापदाचे बरेच अर्थ आहेत. उदाहरणार्थ- नाकारणे, लपविणे, सरकविणे, दूर करणे, प्रतिकूल कार्य करणे, दाबणे, मिटवून टाकणे, अवहेलना करणे, सोडून देणे वगैरे. शेतकऱ्याने जमिनीत बी पेरणे म्हणजे शुद्ध 'कुफ्र' करणे असेही अरबी भाषेत म्हटले जाते.

### 'कुफ्र' शब्दाचा पारिभाषिक अर्थ

इस्लाम (आणि कुरआन) च्या पारिभाषिक शब्दावलीत 'कुफ्र' हा शब्द बऱ्याच अर्थाने वापरण्यात आलेला आहे. उदाहरणार्थ- इस्लामची वास्तविकता लक्षात आल्यावर त्यावर श्रद्धा ठेवण्याऐवजी इस्लामला नाकारणे, मनमस्तिष्कावर सत्य स्पष्ट झाल्यावरही त्याकडे जाणूनबुजून दुर्लक्ष करणे, तिरस्कृत करणे वगैरे. याशिवाय मुस्लिमांच्या वेषात येऊन मुस्लिमांविरूद्ध कटकारस्थानात मुस्लिमविरोधकांची साथ देणाऱ्यांकरितासुद्धा हा शब्द वापरण्यात आला आहे. तसेच मुखावर इस्लाम आणि मनामध्ये इस्लामप्रती कपट ठेवणाऱ्या 'मुनाफिकां'साठी आणि इस्लामच्या काही शिकवणींवर कर्म करणाऱ्या व इस्लामचा काही भाग नाकारणाऱ्यांसाठी, अल्लाहची आंशिक अथवा पूर्णत: अवज्ञा करणाऱ्यांसाठीसुद्धा हा शब्द वापरण्यात आला आहे. अल्लाहचे पैगंबर आदरणीय मुहम्मद (स.) यांनी मुस्लिमांना संबोधित करून म्हटले

आहे, *"ज्याने जाणूनबुजून नमाज अदा करण्याचे टाळले, त्याने 'कुफ्र' केले."*

याशिवाय कुरआनातील ८:२९, ३९:३५, ४८:५, ६४:९, ६५:५, ६६:८ या सहा आयतींमध्ये स्वयं अल्लाहने त्याच्या स्वत:करिता 'कुफ्र' हा शब्द वापरला आहे. उदाहरणार्थ, कुरआनात एके ठिकाणी म्हटले आहे, "अल्लाह तुमच्यापासून तुमचे वाईट कर्म आणि गुन्हेगारीचे कर्म दूर करील." आणखीन एके ठिकाणी म्हटले आहे, "यामुळे तुमच्यातील वाईट कर्म नष्ट होतील."

वरील मजकुरात ही बाब पूर्णपणे स्पष्ट होते की कुरआनात 'काफिर' हा शब्द बिगरमुस्लिमांना अपमानित करण्यासाठी मुळीच वापरण्यात आलेला नाही. 'काफिर' हा शब्द हिंदूंना शिवी देण्यासाठी अथवा त्यांना अपमानित करण्यासाठी कुरआनात वापरण्यात मुळीच आलेला नसल्याचा यापेक्षा आणखीन जास्त ठोस पुरावा काय असू शकेल! तसे पाहता कुरआन ज्या काळात अवतरित झाला, अर्थात इ. स. ६१० ते ६३२ च्या काळात 'हिंदू' हा शब्द अरब प्रदेशात तर सोडाच अगदी भारतातसुद्धा अस्तित्वात नव्हता. इतिहासावरून ही बाब सर्वांनाच माहीत आहे की हा शब्द नंतरच्या शतकांमध्ये अस्तित्वात आलेला आहे. मग हा 'काफिर' शब्द कुरआनात कोणत्या अर्थाने वापरण्यात आला? मुळात हा 'ओळख निश्चित करणारा' शब्द आहे. इस्लामवर श्रद्धा ठेवणाऱ्या (मोमिन / मुस्लिम) व्यक्तीच्या विपरित इस्लामवर श्रद्धा न ठेवणाऱ्या व्यक्तीकरिता प्रयुक्त झालेला आहे. उदाहरणार्थ- 'ग्रॅज्युएट'च्या विपरित 'नॉनग्रॅज्युएट' शब्द जो केवळ ओळखीसाठी असून कोणत्याही जातीधर्माच्या लोकांना अपमानित करण्यासाठी वा शिवी देण्यासाठी मुळीच नाही.

## कुरआनची भूमिका

'काफिरां'साठी कुरआनमध्ये साधारणत: दोन प्रकारच्या बाबींवर आधारित मजकूर आलेला आहे. प्रथम इहलौकिक जीवनासंबंधी तर द्वितीय पारलौकिक जीवनासंबंधी. म्हणजे या जीवनासंबंधी आणि मृत्यूनंतरच्या जीवनासंबंधी. कुरआनचा अथवा इस्लामचा हा सामान्य नियम आहे की प्रत्येक माणसाला या गोष्टीचा पूर्ण अधिकार प्राप्त आहे की त्याने इस्लामचा स्वेच्छेने स्वीकार करावा अथवा आपल्या मर्जीने इस्लाम धर्म नाकारावा. त्याचा हा जन्मसिद्ध अधिकार असून तो कोणीही हिरावून घेऊ शकत नाही. कारण कुरआनने अगदी स्पष्टपणे म्हटले आहे,

"इस्लाम धर्माच्या बाबतीत कोणत्याही प्रकारची बळजबरी नाही." (कुरआन- २:२५६)

याचाच अर्थ असा झाला की कोणी इस्लाम स्वीकारला काय आणि नाकारला काय. कोणी इस्लाम जर स्वीकारला नाही तर यात वाईट वाटण्यासारखे काहीही नाही. कारण या जगात हा अधिकार स्वयं कुरआननेच त्याला दिला आहे. म्हणूनच इस्लाम नाकारणारासुद्धा इस्लाम आणि मुस्लिमांच्या दया, स्नेह, बंधुभाव आणि परोपकारास पात्र आहे. इस्लामचा स्पष्टपणे इन्कार करणाऱ्यांशी द्वेष आणि वैर बाळगण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. म्हणूनच

'काफिर' (इस्लाम नाकारणारी व्यक्ती) च्या प्रति न्याय, सत्यनिष्ठा, मानवी मूल्ये आणि मानवाधिकारानुसारच व्यवहार करण्याची इस्लामने स्पष्टपणे ताकीद केली आहे.

दुसरी गोष्ट अशी की काही इस्लामविरोधकांनी असादेखील गाजावाजा केला आहे की इस्लामने कुरआनात 'काफिरां'संबंधी 'पकडा, दिसतील तेथे ठार करा' वगैरेसारख्या शिकवणी दिल्या आहेत. मात्र कुरआनचा नीटनेटका आणि पूर्ण संदर्भासहित अभ्यास केल्यास निश्चितच ही बाब लक्षात येईल की या शिकवणी किंवा अशा प्रकारचे शब्द सामरिक परिस्थितीशी संबंधित आहेत. याव्यतिरिक्त ज्या 'काफिरां'नी अर्थात मुस्लिमेतरांनी मुस्लिमांना आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांना तब्बल १३ वर्षांपर्यंत छळले, अपमानित केले, शोषण केले, एवढेच नव्हे तर मुस्लिमांना आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांना त्यांची मायभूमी मक्का शहर, घर-परिवार आणि संपत्ती सोडून देण्यास भाग पाडले. मुस्लिमेतरांच्या या अमानुष आणि निष्ठूर छळाला कंटाळून पैगंबर व मुस्लिमांनी आपली मायभूमी, पत्नी-परिवार आणि संपत्ती सोडून तब्बल ४५० किलोमीटर दूर मदीना शहरी आश्रय घेतला. त्या ठिकाणीदेखील विरोधक असलेल्या 'काफिरां'नी संयुक्त लष्कर घेऊन मुस्लिमांवर वारंवार आक्रमण करून त्यांचे अस्तित्व कायमचे नष्ट करण्याचे प्रयत्न केले. पूर्ण अरब द्वीपसमूहातून जागोजागी मुस्लिमांवर हल्ले करण्याची तयारी होत असे. अशा अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत केवळ आत्मसंरक्षणासाठी अल्लाहने कुरआनात मुस्लिमांना या गोष्टीची परवानगी दिली की शत्रू असलेल्या आणि इस्लाम व मुस्लिमांचे अस्तित्व नष्ट करणाऱ्या 'काफिरां'शी युद्ध करावे, त्यांना सापडतील तेथे पकडावे आणि कापावे. ही परवानगी अथवा शिकवण अशा प्रसंगी होती जी मानवजातीच्या पूर्ण इतिहासात युद्धसदृश परिस्थितीत नेहमीकरिता सार्वजनिक मान्यता असलेली आहे. सत्य आणि शांतता स्थापण्यासाठी प्रत्येक सभ्य आणि सुसंस्कृत समाजाने अशा युद्धास पूर्णत: स्वीकृती दिलेली आहे. इतिहास साक्षी आहे की इस्लामी शासनकाळात मुस्लिमांनी जेवढी युद्धे केली व जितक्या लढाया केल्या, त्या केवळ आत्मरक्षणासाठी लढण्यात आल्या अथवा अरब प्रदेश आणि सभोवतालच्या भूप्रदेशात शांतता प्रस्थापित करण्याच्या हेतूने आक्रमणरोधक युद्धाच्या स्वरूपात लढण्यात आल्या. याव्यतिरिक्त बऱ्याच प्रसंगी मुस्लिमांकडून युद्धाच्या तुलनेत तह आणि तडजोड करण्यालाच प्राधान्य दिले. शांतता आणि समझोता करण्याला नेहमीच प्राथमिकता दिली.

काफिरांविषयी अर्थात मुस्मिलेतरांविषयी कुरआनात ज्या दुसऱ्या प्रकारच्या शिकवणी आहेत, त्यांचा संबंध पारलौकिक अर्थात मृत्यूपश्चात जीवनासंबंधी आहेत. कुरआनात अनेक ठिकाणी सत्यधर्माचा इन्कार करण्याच्या फलस्वरूप काफिरांना (मुस्लिमेतरांना) नरकाग्नीची चेतावणी देण्यात आली आहे. हा विषय पूर्णत: अल्लाह आणि मुस्लिमेतर मानवांच्या दरम्यानचा आहे. समस्त मानवजातीचा निर्माता, प्रभू, स्वामी, पालनकर्ता, ईश्वर आणि मानवांच्या दरम्यानचेच हे प्रकरण आहे. अल्लाह अथवा ईश्वर त्याच्या दासांसंबंधी जो

निर्णय पारलौकिक जीवनासाठी घेईल, तो घेईल. यामध्ये कोणत्याही मुस्लिम व्यक्तीची काहीही भूमिका मुळीच नाही. अथवा कोणत्याही मुस्लिमास कोणत्याही बिगरमुस्लिमाची निंदा करण्याचादेखील अधिकार नाही.

## 'काफिर' अर्थात मुस्लिमेतरांप्रती व्यवहार

जे 'काफिर' अर्थात मुस्लिमेतर मुस्लिमांशी कलह ठेवीत नाहीत, मुस्लिमांचा छळ करीत नाहीत, वस्त्या, परिवार व संपत्ती सोडून जाण्यास भाग पाडीत नाहीत, सामरिक कारवाया करीत नाहीत, दुर्बलांवर अन्याय व अत्याचार करीत नाहीत, मुस्लिमांशी माणुसकीने व न्यायपूर्णरित्या वागतात, स्नेह, प्रेम आणि बंधुभावाने वागतात, चांगल्या व सुधारक आणि विधायक कामात सहकार्य करतात, अशा काफिरांशी म्हणजेच मुस्लिमेतरांशी अगदी बंधुवाव, स्नेह व प्रेमाने राहण्याचा आदेश मुस्लिमांना इस्लामने दिला आहे. एवढेच नव्हे तर इस्लामने असा आदेशसुद्धा दिला आहे की बिगरमुस्लिमांशी सहिष्णुतेने वागावे. त्यांचा आणि त्यांच्या धर्माचा पूर्ण आदर करावा. ते ज्या विभूती आणि देवीदेवतांची भक्ती करतात, त्यांची निंदा करू नये. त्यांच्या बाबतीत अपशब्द काढू नये, मुस्लिमेतर का असेना, तो जर अन्याय व अत्याचाराने ग्रस्त असेल तर त्याच्यावरील अन्याय दूर करण्याचा आटोकाट प्रयत्न करावा. रंजल्या-गांजल्या काफिरांनासुद्धा सढळ हाताने मदत करावी. वेठबिगारांनासुद्धा सढळ हाताने मदत करावी, वेठबिगार बिगरमुस्लिमांना वेठबिगारीच्या जोखंडातून मुक्त करण्यासाठी आणि इस्लाम व मुस्लिमांप्रती प्रेमभाव निर्माण होण्यासाठी जकातीमधून त्याची आर्थिक मदतसुद्धा करावी. मुस्लिमांप्रमाणेच त्यांच्याही मानवाधिकारांची पूर्णत: जोपासना करावी. त्यांच्या अधिकारांचे पूर्णत: रक्षण करावे. अर्थातच मुस्लिमांना मुस्लिमेतर अर्थात काफिरांच्या प्रति अशा सहिष्णुता आणि सौहार्दपूर्ण व्यवहाराचा आदेश इस्लामने दिलेला आहे.

यावरून एकच निष्कर्ष समोर येतो की 'काफिर' हा शब्द केवळ एक गुणवाचक संज्ञा असून कोणत्याही विशेष जात, वर्ण, वंश आणि प्रादेशिक लोकसमूहासाठी वापरण्यात आलेला निंदनीय शब्द मुळीच नाही.

*सहावा आक्षेप ०००*

# धर्मपरिवर्तन?

**इस्लाम आणि मुस्लिमांवर असा सर्रास व बिनधास्तपणे आरोप करण्यात येतो की भारतात पूर्वी मुस्लिम शासनकाळात बळजबरीने लोकांना बाटविण्यात आले, बळजबरीने त्यांच्या सुंता करण्यात आल्या, जोरजबरदस्तीने मुस्लिम करण्यात आले. तलवारीच्या जोरावर हिंदूंना इस्लाम धर्म स्वीकारण्यास भाग पाडण्यात आले. आता मात्र पैशांचे आणि संपत्तीचे आमिष देऊन इस्लाम धर्म स्वीकारण्यास भाग पाडण्यात येत आहे. मुस्लिम तरुण हिंदू तरुणींशी प्रेमाचे नाटक करतात. त्यांना प्रेमाच्या जाळ्यात ओढतात, मग त्यांचे धर्मपरिवर्तन करून लग्न करून आपली लोकसंख्या वाढवितात आणि हा प्रकार पूर्वनियोजित कटकारस्थानाचा एक भाग आहे. ही परिस्थिती असह्य असून यामुळे जातीय अथवा सांप्रदायिक तणाव निर्माण होतो, हिंसेला तोंड फुटते. वगैरे...**

*समाधान ०००*

या ठिकाणी विषयवस्तूवर तीन पैलूने दृष्टिक्षेप टाकून उपरोल्लेखित आक्षेप अथवा शंका किंवा गैरसमजूत दूर करण्याचा प्रयत्न करण्यात येत आहे. १) धर्मपरिवर्तनासंबंधी इस्लामची भूमिका. २) मुस्लिम शासनकाळातील धर्मपरिवर्तन आणि ३) वर्तमानकाळात 'धर्मपरिवर्तना'विषयी मुस्लिमांची भूमिका.

## १) धर्मपरिवतर्नासंबंधी इस्लामची भूमिका

इस्लामी नीती-नियम आणि शिकवणी तसेच आदेश-निर्देशांचे दोन मूळ स्रोत आहेत. प्रथम- कुरआन आणि द्वितीय- पैगंबर मुहम्मद (स.) यांचे जीवनचरित्र. या दोनच मूळ स्रोतांच्या माध्यमाने पूर्ण जगातील मानवजातीस संबोधित करून विशुद्ध एकेश्वरत्वावर (आणि परलोकवाद व ईशदूतवादावर) ईमान बाळगण्याचे आवाहन करण्यात आले आहे. याच ईमानच्या आधारावर पूर्ण जीवन व्यतीत करण्याची शिकवण देण्यात आली आहे. शिवाय कधी बौद्धिक तर्काच्या आधारे, कधी मानव-इतिहासाच्या संदर्भाने, या ईमान आणि कर्माच्या ऐहिक व पारलौकिक यशाचा लाभ दाखवून मानवाचे जीवन सत्य मार्गदर्शनाने अलंकृत करण्यात आले आहे. त्याचप्रमाणे इस्लामवर ईमान बाळगणे अथवा इस्लाम स्वीकारणे अथवा याउलट इस्लामचा इन्कार करणे, त्याची अवहेलना व तिरस्कार करणे अथवा नाकारण्याचे ऐहिक व पारलौकिक नुकसान दाखविण्यात आले आहे. यानंतर इस्लामची भूमिका अशी आहे की इस्लामच्या आवाहनावर सकारात्मक अथवा नकारात्मक प्रतिसाद ही एक सर्वथा वैयक्तिक बाब आहे. हा ज्याच्या त्याचा वैयक्तिक प्रश्न असून ईश्वरच त्याचा अंतिम निवाड्याच्या दिवशी योग्य तो निवाडा देईल. इस्लामने मानवाला या गोष्टीचे पूर्ण स्वातंत्र्य दिले आहे की त्याने कोणाच्याही दबावास बळी न पडता, कोणाच्याही आमिषास बळी न

पडता आपल्या विवेकशक्ती आणि बुद्धीचा तसेच निवड-अधिकार स्वातंत्र्याचा पूर्ण वापर करूनच इस्लाम स्वीकारावा अथवा नाकारावा. त्यांच्यावर इस्लाम स्वीकारण्याची जोरजबरदस्ती करण्याचा कोणत्याही मुस्लिमास मुळीच अधिकार नाही. केवळ मुस्लिमालाच नव्हे तर इस्लामी शासनाला, अल्लाहने पाठविलेल्या पैगंबरांना आणि स्वत: पैगंबर मुहम्मद (स.) यांनासुद्धा कोणासही बळजबरीने मुस्लिम बनविण्याचा अधिकार अल्लाहने दिलेला नाही. हे प्रकरण निर्माता, पालनकर्ता अल्लाह आणि त्याच्या मानवांदरम्यानचे आहे. याबाबतीत मागील प्रकरणातसुद्धा आपण थोडक्यात उहापोह केला आहे. (संदर्भ : कुरआन-८८:२२, २:२५६)

## २) मुस्लिम शासनकाळातील धर्मपरिवर्तन

ही बाब चांगल्या रीतीने ध्यानात घ्यावी की मुस्लिमांचा एकमेव आदर्श केवळ इस्लाम व इस्लामी शिकवणी आहेत. याव्यतिरिक्त कोणत्याही मुस्लिम नेत्याने, मुस्लिम शासकाने अथवा मुस्लिम सम्राटाने एखादी गोष्ट इस्लामच्या नियमाविरूद्ध केली असेल तर तो मुस्लिमांकरिता आदर्श नव्हे तर तो अपराधी व गुन्हेगार असून इस्लामी नियमानुसार शिक्षेस पात्र आहे. मुस्लिम शासकांनी वा सम्राटांनी अथवा राजकारण्यांनी केलेल्या कोणत्याही चूक किंवा अपराधाची कोणतीही जबाबदारी वा उत्तरदायित्व वर्तमान मुस्लिमांवर येत नाही. कारण मुस्लिम शासक इस्लामचे प्रतिनिधी आणि वर्तमान भारतीय मुस्लिमांचा आदर्श मुळीच नव्हेत व यापूर्वीही कधी नव्हते. ज्याने पाप अथवा गुन्हा केला, तो निश्चितच शिक्षेस पात्र आहे. मग तो साधारण मुस्लिम असो किंवा मुस्लिम शासक व सम्राट असो. आपण भारतातील आणि इतर देशांतील मुस्लिम शासकांचा जर इतिहास पाहिला तर निश्चितच आपल्या लक्षात येईल की उपरोल्लेखित आरोप व आक्षेप निराधार आणि इस्लाम व मुस्लिमांविरूद्ध तिरस्कार निर्माण करण्याच्या उद्देशाने करण्यात आलेला आहे. सत्ता हस्तगत केल्यानंतर भारतासारख्या विविध समाजांचे लोक वास्तव्यास असलेल्या देशात सत्ता अबाधित ठेवण्याकरिता मुद्दाम आणि जाणूनबुजून जातीवादाचे बी इंग्रजांनी पेरले. 'फोडा आणि राज्य करा'चे राजकारण खेळूनच इंग्रजांनी भारतीय जनतेच्या बोकांडीवर बसून तब्बल १५० वर्षे राज्य केले. हिंदू जनतेच्या मनात इस्लाम व मुस्लिमांविषयी तिरस्कार आणि वैरभाव निर्माण करणाऱ्या तसेच मुस्लिमांच्या मनात हिंदूंविषयी तिरस्कार व वैरभाव निर्माण करणाऱ्या इतिहास व साहित्याची निर्मिती करण्याचा चमत्कार करून त्यांनी सत्ता भोगली. आपण मात्र आपसांत डोकी फोडून घेतली आणि १५० वर्षे त्यांच्या गुलामगिरीचे भोग भोगले. इंग्रजांच्या 'फोडा आणि राज्य करा' या पूर्वनियोजित कुटिल राजकारणावरच आधारित काही विशेष मानसिकता आणि नीती असलेला विशिष्ट वर्ग मागील ६०-७० वर्षांपासून अशाच प्रकारचे साहित्य निर्माण करीत असून इस्लामची प्रतिमा डागाळण्याचा व मुस्लिमांविरूद्ध गरळ ओकून त्यांच्याप्रती द्वेष, तिरस्कार आणि वैरभाव निर्माण करण्याचा प्रयत्न करीत आहे. या ठिकाणी ही बाबसुद्धा लक्षणीय आहे की स्वामी लक्ष्मीशंकराचार्य, बी. एन. पांडे, आर. एस. विद्यार्थी, आर. व्यंकटचलम अडियार, दत्तप्रसन्न साठे आणि यासारख्या अनेक मान्यवर, निष्ठावान व सत्यभाषी मुस्लिमेतर अर्थात हिंदू विद्वानांनी तसेच इतिहासकारांनी इस्लामवरील या आरोपांचे भरपूर

खंडन करून भारतीय जनतेसमोर सत्य परिस्थिती मांडून उपकारच केले. ही गोष्ट वेगळी की या सत्यभाषी विचारवंत हिंदू शोधकर्त्यांचे साहित्य सामान्य जनतेपर्यंत अद्याप पोचू शकले नाही. या संक्षिप्त स्वरूपाच्या मजकुरात सविस्तरपणे लिहिणे शक्य नाही. या ठिकाणी एवढेच सांगणे आवश्यक आणि आपली जबाबदारी समजतो की या सत्यनिष्ठ आणि सत्यभाषी, मानवतावादी विद्वानांच्या विचार व सिद्धांतानुसार मुस्लिम शासनकाळातील धर्मपरिवर्तनाची पाच मूळ कारणे आहेत. ती खालीलप्रमाणे आहेत- (१) भारतामध्ये वर्णव्यवस्थेच्या जुलमी विळख्यात सापडलेले, उच्चवर्णीयांची अमानुष गुलामगिरी इच्छा नसतानादेखील सहन करणारे, उच्चवर्णीयांकडून सतत अपमानास्पद वागणूक सहन करणारे, उच्चवर्णीयांकडून पशुपेक्षाही वाईट वागणूक भोगणारे, विषम व्यवहार आणि मानवाधिकारांची पायमल्ली सहन करणारे, आर्थिक, सामाजिक आणि धार्मिक विषमतेच्या कधीही न विझणाऱ्या आगीत होरपळणारे असंख्य दीनदलित, शोषित आणि पीडित लोक; जेव्हा या लोकांना कुठलाच आधार मिळत नव्हता, त्याचा केविलवाणा आवर्त टाहो ऐकून त्यांचे अश्रू पुसणे व त्यांना हृदयाशी कवटाळणे पाप समजण्यात येत होते, अशा या मानवतेस काळीमा फासणाऱ्या परिस्थितीत त्यांना इस्लाममध्ये न्याय, समता, सन्मान आणि बंधुत्वाची शीतल सावली दिसली, तेव्हा ते या शीतल छायेत विसावण्यासाठी अक्षरश: धावत आले आणि धर्मपरिवर्तन करून मुस्लिम झाले. (२) इस्लामच्या मूळ धारणांशी आपली मूळ प्रकृती आणि स्वभाव अनुकूल असल्याचे पाहून इस्लाम धर्माचा स्वेच्छेने स्वीकार केला. (३) इस्लामी पद्धतीच्या उपासनेची (नमाज) सहजता व सौंदर्याच्या आकर्षणाने लोकांना इस्लामच्या जवळ आणले. (४) इस्लामी सभ्यता, नैतिकता व महात्म्य आणि इस्लामची सर्वव्यापी व्यवस्था तसेच त्याच्या पारिवारिक, सामाजिक, आर्थिक व्यवस्थेच्या नैसर्गिक वैशिष्ट्यामुळे लोकांना इस्लामविषयी कमालीचे आकर्षण निर्माण झाले आणि त्यांना यशस्वी जीवनपद्धतीचे इस्लाममध्येच स्पष्ट दर्शन घडले म्हणून इस्लामचा स्वीकार केला. (५) इस्लामी राज्यव्यवस्थेत न्याय आणि शांततेच्या स्थापनेमुळे लोकांनी इस्लाम स्वीकारला.

मुन्शी प्रेमचंद, साने गुरुजी, आचार्य विनोबा भावे, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, दत्तप्रसन्न साठे, स्वामी लक्ष्मी शंकराचार्य, एम. एन. रॉय, रामधारी सिंह दिनकर, स्वामी विवेकानंद, विजय गोपाल मंगल, बी. एन. पांडे, प्रा. के. एस. रामाराव, राजेंद्र नारायणलाल, काशीराम चावला, व्यंकटचलम अडियार, पेरियार इ. व्ही. रामास्वामी, कोडिक्कल चेलप्पा, मोहनदास गांधी आणि यांसारख्या असंख्य विचारमार्तंड आणि पंडितांनी इस्लामच्या वैशिष्ट्ये आणि महिमत्वावर तर्कपूर्ण व प्रभावीपणे शिक्कामोर्तब केले आणि मुस्लिम शासनकाळात धर्मपरिवर्तनाच्या वास्तविक कारणांविषयी जे काही लिहिले आहे, ते इस्लामवर आक्षेप घेणाऱ्यांना जबरदस्त चपराक आहे.

## ३) वर्तमानकाळातील धर्मपरिवर्तन आणि मुस्लिम

मागील कित्येक शतकांपासून आजपर्यंत जगाच्या पाठीवर इतर देशांप्रमाणेच भारतातसुद्धा लोक धर्मपरिवर्तन करीत आहेत. काही इतर धर्मांचे धर्मप्रचारक जर लोकांचे धर्मपरिवर्तन

करीत असतील तर त्यांची जी काही पद्धत असेल, ती असू द्या आणि त्याचा उद्देशसुद्धा जो काही असेल तो असू द्या. मात्र त्या सर्वांपेक्षा भारतातील मुस्लिमांची गोष्टच निराळी आहे. कारण भारतातीलच नव्हे तर जगातील सर्वच मुस्लिमांना हे चांगल्या रीतीने माहीत आहे की पैसा आणि संपत्तीचे आमिष देऊन अथवा जोरजबरदस्ती करून लोकांना मुस्लिम बनविणे अर्थात इस्लाम स्वीकारण्यास भाग पाडणे अक्षम्य महापाप आहे. इस्लाम अशा अनैतिक आमिष आणि बळजबरीची मुळीच परवानगी देत नाही. (सन १९८० च्या दशकात दक्षिण भारतातील कित्येक गावांच्या लोकांनी इस्लाम स्वीकारला होता. त्या वेळेस या गोष्टीचा जबरदस्त गवगवा करण्यात आला होता की यामध्ये पेट्रोडॉलर्सचा सर्रास वापर करण्यात आला. देशातील कानाकोपऱ्यातून उच्चवर्गाचे लोक तेथे पोचले होते. 'सरिता' या नियतकालिकाचे अन्वेषकसुद्धा तेथे पोचले आणि मग पूर्ण तपासांती त्यांनी सविस्तरित्या लिहिले की या लोकांनी जो इस्लाम स्वीकारला तो पेट्रोडॉलर्सच्या आमिषाला बळी पडून नव्हे तर शतकानुशतकांपासून अस्पृश्यतेच्या आगीत जळणाऱ्या, शोषित, पीडित आणि व्यापक रूपाने बहिष्कृत व तिरस्कृत लोकांनी इस्लामच्या प्रदत्त मानव समानता व मानव सन्मानाने प्रभावित होऊन इस्लाम धर्माचा स्वीकार केला.) दलितपणा, शोषण, अस्पृश्यता, अपमान, दारिद्र्य व यासारख्या ना-ना प्रकारच्या निष्ठूर व अमानवी अत्याचारांची देवता आजही न्याय, प्रेम, समता व बंधुत्वाच्या मानगुटीवर पाय देऊन नग्न तांडव करीत आहे. यापासून मुक्त होण्याचा मार्ग हा धर्मपरिवर्तन असल्याचे स्पष्टपणे जाणवते. कदाचित वर्णव्यवस्था ही परिस्थिती सदा कायम ठेवील. इस्लामने जगाच्या पाठीवरील सर्व मुस्लिमांना कुरआनात अशी स्पष्ट शिकवण दिली आहे, "तुम्ही तो उत्तम समुदाय आहात, जो मानवजातीच्या कल्याणासाठी उत्पन्न करण्यात आला आहे." (कुरआन-३:११०) "आणि (लोकांना) आपल्या पालनकर्त्याने दाखविलेल्या सत्यमार्गाकडे पूर्ण विवेकतेने चांगल्या वाणीने तसेच उत्तम संवादाद्वारे हाक द्या." (कुरआन-१६:१२५)

इस्लामने मुस्लिमांना हा आदेश समस्त मानवजातीच्या कल्याण, हित आणि उपकारास्तव दिला आहे. मनात शुभ आकांक्षा व शुभेच्छा घेऊन इस्लामचा प्रचार-प्रसार करण्याचा आदेश दिला आहे. भारतीय मुस्लिमांपैकी काहीजण हे पुण्य, पवित्र आणि महान कल्याणकारी कार्य नि:स्वार्थी भावनेने पार पाडीत आहेत. आपल्या प्रिय देशबांधवांपर्यंत इस्लामचा संदेश पोचवित आहेत. देशबांधवांच्या मातृभाषेत आपल्या ऐपतीप्रमाणे कुरआन वितरित करीत आहेत. केवळ इतकेच काम ते करीत आहेत आणि पूर्ण देश यास साक्ष आहे. यानंतर काहीजण धर्मपरिवर्तन करून सत्यमार्ग स्वीकारू इच्छित असतील तर हे त्यांच्या आणि ईश्वराच्या दरम्यान एक वैयक्तिक प्रकरण आहे.

ज्या ठिकाणी मुस्लिम तरुण आणि मुस्लिमेतर तरुणींच्या विवाहाच्या आधारावर धर्मपरिवर्तनाचा मुद्दा उपस्थित करण्यात येत असतो, त्याबाबतीत आमचा असा अनुभव आहे की यात आधुनिक म्हटल्या जाणाऱ्या पाश्चिमात्य संस्कृतीची महत्त्वपूर्ण भूमिका आहे.

सहशिक्षण घेत असताना शाळा आणि महाविद्यालयांत तसेच नोकरी करताना कार्यालयात तरुण-तरुणींच्या भावनिक देवाणघेवाण होणे, प्रसंगी एकांतात भेटीगाठी होणे, या सर्व बाबींमुळे स्वभावत:च दोघांमध्ये घनिष्ठ आणि भावनिक संबंध निर्माण होतात. तारुण्याच्या उंबरठ्यावर नुकतेच पाऊल ठेवलेल्या आणि आधुनिकवादाने पिसाळलेल्या बिनधास्त मुलामुलींना बॉयफ्रेंड आणि गर्लफ्रेंड पाहिजे असतात. या अभद्र संस्कृतीची किळसवाणी लाट पाहून आपल्याकडील आधुनिकतावादी महाभागांना खूप गर्व चढतो. मात्र ही पाश्चिमात्यांकडून आलेली लाट आहे. ही संस्कृती मुस्लिमांची अथवा इस्लामने दिलेली नाही. आजच्या वाया जात असलेल्या या तरुण पिढीतील तरुण-तरुणींचे बिनधास्त संबंध आतल्या आत कसे-कसे अनैतिक रूप धारण करतात, यापासून बेपर्वा व विनाफिकीर आणि संवेदनहीन समाजाला याची मुळीच काळजी असल्याचे दिसत नाही की हा केवळ मोठा अनर्थ घडणार आहे. या ढिसाळ आणि आधुनिकतेच्या मस्तीत झिंगलेल्या समाजाकडे या गोष्टीचे औचित्यच नाही की या तरुण-तरुणींना या दुष्कर्मापासून रोखण्यात यावे. बदलणाऱ्या आणि बिघडणाऱ्या या सामाजिक वातावरणात जर का एखाद्या मुस्लिम युवकास मुस्लिमेतर तरुणीने पतीच्या स्वरूपात स्वीकार केले तर यासाठी ही आधुनिकतावादी पाश्चिमात्य संस्कृतीच जबाबदार असून याचे खापर मुस्लिमांच्या माथ्यावर फोडणे न्यायपूर्ण ठरणार नाही. यामध्ये मुस्लिमांची कोणतीही कुटिल नीती अथवा धार्मिक व राजकीय डावपेच समजणे चुकीचे ठरेल.

*सातवा आक्षेप ...*

## 'मुस्लिम पर्सनल लॉ' - पृथकतावाद?

**भारताचे मुस्लिम या देशाचे नागरिक असताना ते वेगळा पर्सनल लॉ (मुस्लिम व्यक्तिगत कायदा) पाहिजे असल्याचा आग्रह अथवा हट्ट का धरतात? त्यांच्या या मागणीमुळे त्यांच्यात पृथकतावादाची भावना आढळून येते. समस्त भारतीयांकरिता 'समान नागरी कायदा' (Uniform Civil Code) असायलाच पाहिजे. देशाची अखंडता व समस्त नागरिक कायद्याच्या दृष्टीत समान असण्याकरितासुद्धा याची गरज आहे. देशाची घटनाही हीच मागणी करते.**

*समाधान ...*

या आक्षेप वा गैरसमजुतीचे तीन पैलू आहेत- (१) भारतीय संविधानात 'समान नागरी कायद्या'चा उल्लेख असणे, (२) 'समान नागरी कायदा' लागू न होण्याच्या परिणामी देशाच्या एकता व अखंडतेस धोका निर्माण होणे आणि (३) मुस्लिमांचा वेगळा 'पर्सनल लॉ' मागणीचा हट्ट.

या ठिकाणी आपण एकेका पैलूवर स्वतंत्रपणे चर्चा करू या.

### १) भारतीय संविधानात 'समान नागरी कायद्या'चा उल्लेख

ही बाब खरी आहे की भारतीय घटनेत समान नागरी कायदा लागू करण्याचा उल्लेख आहे. मात्र हा उल्लेख मूळ संविधानात नसून घटनेच्या प्रस्तावनेत आहे. मूळ घटनेच्या कलम २५(१) आणि २६(बी) च्या अंतर्गत ज्या बाबींचा उल्लेख करण्यात आला आहे, त्याचा सारांश असा की प्रत्येक धार्मिक समुदायास या गोष्टीचा पूर्ण अधिकार आहे की आपल्या धर्माचे पूर्णत: पालन करावे आणि आपल्या धार्मिक क्रियाकर्मे करावीत. म्हणून हे प्रकरण केवळ मुस्लिमांचेच (अथवा इतर अल्पसंख्याक समुदायाचेच) नसून याच्या अंतर्गत देशात समान नागरी कायदा लागू न करण्याची घटनेत तजवीज आहे.

### २) देशाच्या एकता व अखंडतेचा प्रश्न

जर 'पर्सनल लॉ'मुळे देशाच्या एकता व अखंडतेस धोका निर्माण होत असेल तर मुस्लिमांपेक्षा जास्त त्या बुद्धिजीवी आणि भारताच्या शुभचिंतकांवर आरोप अथवा आक्षेपाची छाया पडते ज्यांनी जगातील सर्वोत्तम संविधान समजल्या जाणाऱ्या संविधानाची निर्मिती करून त्यात २५(१) आणि २६(बी) कलमांचा उल्लेख केला.

जर मुस्लिम समुदाय फौजदारी कायद्याच्या कलमाची अंमलबजावणी करतो, कारण फौजदारी प्रकरणात दुसरा पक्ष मुस्लिमेतरसुद्धा असू शकतो; त्याचप्रमाणे दिवाणी प्रकरणांपैकी वैयक्तिक, घरगुती व कौटुंबिक विषय सोडून (ज्यात दुसरा पक्ष मुस्लिमेतर असू शकत नाही) प्रत्येक नागरिकावर लागू असलेल्या कायद्याचीच अंमलबजावणी करतो, तेव्हा केवळ थोड्याशा दिवाणी प्रकरणांत (उदाहरणार्थ- विवाह आणि तलाक इत्यादी) वेगळ्या कायद्यावर

अंमलबजावणी करीत असेल तर यामुळे देशाच्या एकता आणि अखंडतेस धोका निर्माण होण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. देशाच्या स्वातंत्र्यापासून आजपर्यंत ६३ वर्षे लोटलीत. मात्र अजून तरी अशी परिस्थिती कधी समोर आली नाही. जर देशाच्या एकता व अखंडतेस खरोखरच धोका निर्माण होण्याची संभावना असती तर या ६३ उन्हाळ्या-पावसाळ्यांत थोडीफार एखादी भेग तरी भारतभूमीत पडली असती. मात्र या ६३ वर्षांमध्ये असे काही घडले नाही. उलट या ६३ वर्षांच्या काळात भारतीय मुस्लिमांनी भारताच्या विकास आणि प्रगतीमध्ये इतर कोणत्याही जातीधर्माच्या लोकांपेक्षा (मग ते बहुसंख्यक असो की अल्पसंख्यक) कमी योगदान दिले नाही. हे प्रत्येक भारतीयाला आणि देशाच्या अखंडतेविषयी काळजी करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीस चांगलेच माहीत आहे. विचार करण्याची गोष्ट अशी आहे की देशाच्या एखाद्या समुदायाने आपल्या वैवाहिक अथवा वैयक्तिक कौटुंबिक प्रकरणात इतर जातीधर्माच्या लोकांपेक्षा भिन्न पद्धतीचा अवलंब केला तर याचा संबंध देशाच्या एकता व अखंडतेशी येतोच कुठे? ही निव्वळ पोरकटपणाचीच कल्पना वाटत नाही काय? इतक्याशा बाबीला राईचा पर्वत करून मुस्लिमांवर वेगळी चूल मांडण्याचा जो आरोप करण्यात येतो आहे, त्यात तथ्य किती आणि राजकारण किती हे न समजण्याइतपत नागरिक निर्बुद्ध मुळीच नाहीत.

भारताच्या एकता आणि अखंडतेस धोका कधी निर्माण होऊ शकतो? तर याचे खूप सोपे आणि स्पष्ट उत्तर आम्ही आपल्यासमोर सादर करू इच्छितो आणि ते असे की जेव्हा भारतातील विविध समुदाय अथवा विविध जातीधर्माच्या लोकांना यासाठी विवश करण्यात येईल की त्यांनी आपापल्या धार्मिक नियम आणि मान्यता, तसेच वैयक्तिक व कौटुंबिक क्षेत्राच्या परंपरा आणि रीतीरिवाज सोडून द्यावे. परिणामी ही बाब केवळ मुस्लिमांपुरतीच मर्यादित राहणार नसून इतरही अल्पसंख्याक समुदाय आणि एव्हाना बहुसंख्य (हिंदू) समाजात (जो वर्ण, वंश, जाती, उपजाती, व आधारीत असंख्य छोट्या-छोट्या वर्गांत आणि जातीजातींत विखुरलेला आहे) अंतर्गत संघर्ष उफाळून अशांती व उपद्रवाचे वादळ उठेल. त्यामुळे समान नागरी कायद्याचा मुद्दा वारंवार उचलणारे महाभागसुद्धा मूग गिळून ही बाब मान्य करतात आणि सांगतात की आपल्या देशात कोणत्याही प्रकारचा समान नागरी कायदा लागू करणे उचित व व्यावहार्य ठरणार नाही.

## ३) मुस्लिमांचा आग्रह

'मुस्लिम पर्सनल लॉ'विषयी मुस्लिमांनी आग्रही असण्याची प्रामुख्याने दोन कारणे आहेत. पहिले कारण असे की 'पर्सनल लॉ'चे कायदे ('निकाह' म्हणजेच इस्लामी विधीनुसार विवाह, 'तलाक' म्हणजे इस्लामी विधीनुसार घटस्फोट वगैरे) हे स्वतः मुस्लिमांनी तयार केलेले नसून ते मुळात ईश्वरनिर्मित आहेत. शरियत (इस्लामी विधान) ची मौलिक रूपरेखा स्वयं अल्लाहनेच तयार केलेली असून याची व्याख्यादेखील अल्लाहनेच केलेली आहे. जगातील कोणत्याही मुस्लिम व बिगरमुस्लिम विचारवंतास, मुस्लिम धर्ममार्तंडास, शासकास व कोणत्याही सम्राटास, तत्त्वज्ञास, विधान परिषदेस व राज्यसभेस, नेत्यास व जगातील

संपूर्ण मुस्लिम समुदायास अल्लाहने निश्चित केलेल्या आणि आदरणीय पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यामार्फत पाठविलेल्या या व्याख्येत अगदी तसूभरही परिवर्तन करण्याचा कवडीमात्र अधिकार नाही. ही व्याख्या समस्त जगातील मुस्लिमांसाठी जग अस्तित्वात असेपर्यंत अटळ आणि अपरिवर्तनीय आहे. या व्याख्येची सीमेचे किंचितही उल्लंघन केल्यास इस्लामचा तिरस्कार ठरेल आणि मुस्लिम समुदाय मुस्लिम असण्याच्या परिभाषेतून विभक्त होईल. हीच छोटीशी आणि अत्यंत महत्त्वपूर्ण बाब अर्थात इस्लामची वास्तविकता तसेच इस्लाम आणि मुस्लिमांदरम्यानचे अटळ व अपरिवर्तनीय संबंध असलेल्या मुस्लिम-जीवनाच्या विशेष क्षेत्रात शरियतची ही भूमिका लक्षात येत नसल्यामुळेच आपल्या मुस्लिमेतर देशबांधवांना ही अडचण कधी-कधी भेडसावत असते की अखेर मुस्लिम समुदाय 'पर्सनल लॉ' (व्यक्तिगत विधी) चा इतका घोर आणि जोरदार हट्ट का करतात आणि समान नागरी कायद्याचा विरोध का करतात!

दुसरे कारण असे की इतर कोणत्याही बुद्धिजीवी भारतीय नागरिकाप्रमाणेच मुस्लिमांनासुद्धा असा दृढ विश्वास आहे की मुस्लिमांच्या 'पर्सनल लॉ'चा पृथकवादाशी कोणताही संबंध नसून यामुळे केसभरसुद्धा भारताच्या एकता व अखंडतेस धोका नाही. याउलट हे मात्र निश्चित की मुस्लिमविरोधी राजकारण (मतांचे ध्रुवीकरण) करण्यासाठी काही काळानंतर असे मुद्दे उपस्थित करून राजकारण खेळण्यात येते. वस्तुस्थिती अशी आहे की अशा प्रकारचे राजकारण खेळणाऱ्यांनासुद्धा 'समान नागरी कायदा' नको आहे.

*आठवा आक्षेप ...*

## सर्वधर्मसमभाव - का नाही?

**जगातील सर्वच धर्म चांगली शिकवण देतात. सर्वच धर्म एकाच शाश्वत शक्तीचा उद्घोष करतात. केवळ वेगवेगळ्या नावांनी या एकमेव शक्तीचा स्वीकार करतात. उदाहरणार्थ- ईश्वर, अल्लाह, गॉड वगैरे. वेगवेगळ्या वाटा असल्या तरी समस्त धर्मांचे अंतिम लक्ष्य शेवटी एकच आहे. अशा प्रकारे सर्व धर्म सत्य आणि समान असूनसुद्धा इस्लाम केवळ स्वत:लाच 'सत्यधर्म' असण्याचा दावा का करतो? विविधतेत एकतेचा पक्ष का घेत नाही?**

*समाधान ...*

'उतावळा नवरा गुडघ्याला बाशिंग' ही म्हण आपणा सर्वांनाच माहीत आहे. पूर्ण संयम आणि सबुरीने परिपूर्ण अभ्यास व अध्ययन न करताच मिळालेले अपूर्ण ज्ञान आणि या अपूर्ण ज्ञानाच्याच डळमळीत आधारावर घेण्यात येणाऱ्या तत्काळ निर्णयामुळे असा प्रश्न पडणे स्वाभाविक आहे. अर्थातच धर्माच्या बाबतीत गहिरे व गंभीर चिंतन-मनन व अध्ययन आणि अभ्यासाच्या कमतरतेमुळे असा प्रश्न निर्माण होऊ शकतो. आजचा काळ हा अपूर्ण अभ्यासाच्या आधारे निर्णय घेण्याचा मुळीच नसून पूर्णत: ज्ञान-विज्ञान, शोधबुद्धी, विवेक व तर्कबुद्धीने विषयाच्या मुळापर्यंत जाऊन सर्वांगी अभ्यास करण्याचा हा काळ आहे, हे विसरता कामा नये. मात्र ही मोठी विचित्र आणि विलक्षण बाब आहे की धर्मासारख्या अतिमहत्त्वपूर्ण विषयावर कोणत्याही प्रकारे गांभीर्याने अभ्यास न करताच 'उचलली जीभ आणि लावली टाळूला'चा प्रत्यय येतो. लागलीच निर्णय घेऊन पांडित्याचा तोरा मिरवित त्याचा प्रसार व प्रचार जोरदारपणे सुरू होतो.

अर्थात सर्वधर्मसमभावाची विचारसरणीसुद्धा याच उतावळेपणाचा स्पष्ट परिणाम आहे. पुढील मजकुरात विविध पैलूंवर दृष्टी टाकून वस्तुस्थितीवर प्रकाश टाकण्याचा प्रयत्न करू या. या प्रयत्नांती ही वस्तुस्थिती समोर येईलच की 'इस्लाम केवळ स्वत:च सत्यधर्म असण्याचा दावा का करतो?' या दाव्यास कोणते तर्कशुद्ध आधार आहेत आणि ते किती स्वाभाविक व बुद्धीसंमत आहेत!

### धर्म

खरे पाहता धर्म ही मानवी मूल्ये (सद्गुण) आणि यावर आधारित उत्तमोत्तम शिकवणींच्याही वरच्या दर्जाची बाब आहे. चांगले आणि उत्तम गुण (उदाहरणार्थ- पुण्यकर्मे, सत्य बोलणे, खोटे बोलण्यापासून व निंदनीय कर्मांपासून दूर राहाणे, इतरांची मदत करणे, दु:खीजनांचे अश्रू पुसणे, दरिद्री आणि गरजवंतांना साहाय्य करणे, पीडित आणि शोषितांना न्याय मिळवून देणे वगैरे वगैरे) हे प्रत्येक व्यक्तीच्या स्वभाव आणि प्रकृतीमध्येच आहे. मग ती व्यक्ती कोणत्याही धर्माची अनुयायी असो की निधर्मी व नास्तिक असो. धर्म अशा सद्गुणांची

शिकवण तर देतोच शिवाय खूप महत्त्वसुद्धा देतो. त्याचप्रमाणे मानवसमाजात या गुणांचे प्रचलन, वृद्धी आणि विकास व स्थापनेवरसुद्धा खूप जोर देतो. मात्र मानवी प्राकृतिक असलेल्या व माणसाच्या स्वभावातच असलेल्या या सद्‌गुणांच्या आधारावर धर्माची अतिभव्य आणि विशाल इमारत उभी राहू शकत नाही. म्हणून धर्मासंबंधी एक निर्णायक नीती वा भूमिका निश्चित करताना बुद्धिसंमत असलेल्या धर्माच्या मूळ तत्त्वापासून सुरूवात करणे आवश्यक आहे. या ठिकाणी ही बाब स्पष्ट होणेदेखील आवश्यक आहे की या सृष्टीमध्ये अनेक अशा मान्यतापूर्ण बाबी आहेत ज्या धर्माच्या अंतर्गत नसून मत अथवा भूमिकेच्या अंतर्गत येत असतात. या दोहोंच्या दरम्यान लक्षणीय फरक अथवा अंतर आहे आणि तो याप्रमाणे की धर्मामध्ये ईश्वरास केंद्रीय स्थान प्राप्त आहे. तसेच मत अथवा भूमिकेमध्ये एक तर ईश्वराची मुळात कोणतीही परिकल्पनाच नसते अथवा उदासीन (Agnostic) असते किंवा ईश्वराला पूर्णपणे नाकारणारी नास्तिकवादी भूमिका असते. तरीदेखील धर्माच्या अनुयायांत आणि मत वा भूमिकेच्या अनुयायांतसुद्धा सर्वच मौलिक मानवी गुण आणि मूल्ये आढळतात.

उपरोक्त परिप्रेक्ष्यात केवळ तोच धर्म लक्षणीय आहे, जो ईशकेंद्रित असेल. अशा धर्मामध्ये ईश्वरावर विश्वास ठेवताच आणखीन काही तत्संबंधित गोष्टींवर विश्वास ठेवणे गरजेचे असते. उदाहरणार्थ- ईश्वर हा स्रष्टा, निर्माता, रचयिता, प्रभू, स्वामी, उपास्य, पूज्य असण्यावर विश्वास ठेवणे आवश्यकच नव्हे तर अत्यावश्यक ठरते. याबरोबरच त्याच्या अनेक गुणांवर, शक्ती-सामर्थ्य, क्षमता व पात्रतांवरसुद्धा विश्वास ठेवणे आपोआपच अनिवार्य ठरते. मग येथून आणखीन दोन पावले पुढे पडतात. तसेच ईश्वराची वास्तविकता काय आहे; तो मानवांकडून त्याची (ईश्वराची) पूजा व उपासना का व कशा रितीने करवून घेऊ इच्छितो; आपल्यासाठी व आपल्या जीवनासंबंधी त्याचे आदेश, आज्ञा, नियम, पद्धती, पैलू, मर्यादा, त्याच्या आज्ञापालनाच्या पद्धती वगैरे म्हणजेच आपल्या आणि ईश्वराच्या दरम्यानच्या घनिष्ठ संबंधाची व्यापक रूपरेखा कोणती व कशी असावी हे सविस्तर जाणून घेण्यासाठी मानवास ईश्वराकडूनच एका आदेशपत्राची नितांत गरज आहे आणि याच आदेशपत्राला दुसऱ्या शब्दांत 'ईशग्रंथ' असे म्हणतात. आणखीन दोन पावले पुढे टाकल्यास आणखीन एक गोष्ट लक्षात येते की हे असल्यावर मानव आणि ईश्वरादरम्यान एक मानवी आदर्श माध्यमसुद्धा असणे अनिवार्य आहे. (याच मानवी आदर्श माध्यमास पैगंबर, प्रेषित, रसूल, नबी (प्रॉफेट) असे म्हटले जाते.) याबरोबरच हे जाणून घेणेसुद्धा गरजेचे आहे की धर्माची मूळ धारणा काय आहे आणि त्या मूळ धारणेच्या अंतर्गत आणखीन कोणकोणत्या मौलिक दर्जाच्या उपधारणांचा मेळ बसून कोणता परिघ तयार होतो, जो धर्माच्या मर्यादा निश्चित व निर्धारित करतो, ज्याच्या आत राहूनच माणूस धर्माचा अनुयायी ठरतो आणि त्यांचे उल्लंघन केल्यास तो निधर्मी ठरतो. धर्म जर वस्तुत: धर्म आहे, सत्यधर्म आहे, शाश्वत धर्म आहे, सर्वमान्य आहे, सर्वस्वीकृत आहे आणि त्याची सुनिश्चित रूपरेखा व सीमा आहे, तर त्यास त्या मनुष्याचा धर्म होण्याचा अधिकार प्राप्त असतो, जो मात्र एक प्राणी, एक जीवच नाही तर सृष्टीचे श्रेष्ठतम अस्तित्वसुद्धा आहे.

## सर्वच धर्म समान आहेत काय?

या प्रश्नाचे उत्तर शोधण्यापूर्वी काही महत्त्वपूर्ण गोष्टींवर विचार करणे आवश्यक आहे- ज्याअर्थी ईश्वर एकमात्र आहे; प्रत्येक सजीव आणि निर्जीव सृष्टीची निर्मिती त्याच एका ईश्वराने केली आहे, विशेषत: मनुष्याचा निर्माता तोच एक ईश्वर आहे; ही सृष्टी अथवा ब्रह्मांड (ज्याचा एक घटक मनुष्य आहे) त्याच एका ईश्वराच्या शक्ती व सामर्थ्य-सत्तेच्या अधीन आहे; मनुष्याची शारीरिक संरचना एकसारखी आहे; वायूमंडल एक आहे; वाईट कृत्य, पापकर्मे आणि अपराधांची परिकल्पनासुद्धा सर्व मानवांसाठी एकच असून चांगुलपणा व पुण्यकर्मांची परिकल्पनादेखील एकच आहे; सत्य एक आहे जे नैसर्गिक व अपरिवर्तनशील आहे... तर मग धर्मच अनेक कशाला असावेत? ज्याअर्थी या विश्व आणि सृष्टीच्या मोठमोठ्या वास्तविकता ज्यांचा प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष संबंध मनुष्याशी आहे, त्यादेखील एकच असताना मनुष्यातील अनेक धर्म असण्याची गरजच काय? ही बाब तर्काशी आणि बुद्धीशी मुळीच संबंधित असू शकत नाही! मानवी बुद्धी आणि विवेक ही अनेकता मुळीच स्वीकारू शकत नाही.

## इस्लामची विचारधारा

इस्लामने ही समस्या वा अडचण अत्यंत सहजरित्या दूर केली आहे. या विचारसरणीनुसार धर्म (अनेक धर्म नव्हे) मात्र एकच आहे. धर्म हे नैसर्गिक व शाश्वत सत्य आहे. हे एकच आहे, एकच होते आणि एकच राहणार. यास विभिन्न काळात विविध भाषांमध्ये अनेक शब्द व अनेक संबोधनांनी संबोधण्यात येत असले तरी (हे तर्कसंगतही आहे) त्यासाठी अनेक शब्द प्रयुक्त झाल्यामुळे धर्म अनेक होत नसतात. सत्यामध्ये विरोधाभास आणि विषमता शक्य नाही. म्हणूनच ज्यात विरोधाभास आणि विषमता असेल तो सत्यधर्म असूच शकत नाही. आणि जर का अनेक धर्म निर्माण झाले अथवा निर्माण करण्यात आले आणि सर्वांची मूलधारणा अथवा मूलभूत मान्यता व अवधारणांमध्ये मोठी तफावत असेल तर, त्यात मोठमोठे विरोधाभास असूच शकत नाही. शिवाय सर्वच सत्य आणि समान असणेही शक्य नाही. ही बाब आणखीन जास्त स्पष्टपणे समजण्यासाठी वस्तुस्थितीवर एक तथ्ययुक्त दृष्टी टाकणे आवश्यक ठरते.

## धर्म आणि धर्मांच्या कल्पना परस्पर प्रतिकूल आहेत

धर्म जर धर्मांमध्ये रूपांतरित होत असेल अर्थात एका धर्माचे अनेक धर्मांत परिवर्तन होत असेल तर यात निश्चितच विषमता निर्माण होते. या विषमता जेव्हा मूलभूत धारणा, सिद्धान्त आणि शिकवणींत प्रत्यक्ष व स्पष्ट रूपाने अवलोकित झाल्यास आणि समाजावर खोलवर प्रभाव टाकीत असल्यास समाजामध्ये भिन्नतेची मुळे इतकी खोलवर रुजतात की 'सर्वधर्मसमभाव' असण्याचा एकमेव उद्घोष तर होऊ शकतो मात्र तो व्यावहारिकतेचे स्वरूप धारण करू शकत नाही. अशा प्रकारच्या काही मुख्य विषमता या ठिकाणी सादर करण्यात येत आहेत.

## धर्मांमधील विषमता

* एक धर्म म्हणतो की पूज्य, उपास्य केवळ एकच ईश्वर आहे आणि दुसरा धर्म म्हणतो की एक उपास्य नव्हे आणखीन दोन उपास्य आहेत.
* पूज्य-उपास्य असण्यात एक आणि तीनपर्यंतच प्रकरण मर्यादित राहत नसून आणखीन एक तिसरा धर्म म्हणतो की पूज्य-उपास्य तर शेकडो, हजारो, लाखो आणि करोडो आहेत.
* एका धर्माने सांगावे की ईश्वर न कोणाची संतती आहे न त्याला एखादी संतती आहे. दुसऱ्या धर्माने सांगावे की ईश्वराला एक मुलगासुद्धा आहे. मुलगा असण्याच्या नात्याने तो ईशत्वामध्ये ईश्वराचा भागीदार अथवा वाटेकरी आहे. याउलट पहिल्या धर्माने असे सांगावे की ईश्वराचा कोणीही भागीदार किंवा वाटेकरी नाही.
* एका धर्माने तर सांगावे की ईशपरायण जीवन जगणारी व्यक्ती मृत्यू पावल्यावर स्वर्गात जाईल आणि याविपरित चारित्र्याची व्यक्ती नरकात जाईल. तर दुसऱ्या धर्माने सांगावे की अमूक व्यक्तिमत्त्वास ईश्वराचा पुत्र स्वीकारल्यामुळेच माणूस स्वर्गात जाईल, मग तो कितीही पापी, अन्यायी व अत्याचारी का असेना व त्याने कितीही व्यभिचार व रक्तपात केलेला का असेना.
* एक धर्म सांगतो की पूज्य केवळ ईश्वरच असून त्याव्यतिरिक्त इतर कोणीही मुळीच नाही. तर दुसरा धर्म म्हणतो की माता-पिताही पूज्य आहेत; गुरुसुद्धा पूज्य आहेत, पशू, नदी, वृक्ष, सापदेखील पूज्य आणि ऋषी-मुनी, महापुरुष, धर्माचार्यसुद्धा पूज्य आहेत.
* एक धर्म म्हणतो की पुरुषाने (आपली पत्नी नसलेल्या) कोणत्याही परस्त्रीला वासनेच्या भरात स्पर्श जरी केला तर त्यास या अपराधास्तव नरकाग्नीत यातना भोगाव्या लागतील तर याउलट दुसरा धर्म म्हणतो की पत्नीला मूल होत नसेल तर तिच्या पतीने तिला परपुरुषाकडे नियोग (गर्भधारणेकरिता संभोग) करण्यासाठी पाठवावे, याला सामाजिक आणि नैतिक स्वीकृतीसुद्धा मिळेल.
* एक धर्म मद्यपान, दारू-गांजा, मादक पदार्थांचे सेवन, जुगार, सट्टा, लॉटरी अवैध आणि वर्ज्य ठरवितो तर दुसरा धर्म याच बाबी वैध आणि धर्मसंमत ठरवितो.
* एक धर्म म्हणतो की ईश्वर निराकार आहे. तो केव्हाही, कोणत्याही कारणास्तव, कोणत्याही उद्देशाने, कोणत्याही प्रकारचा आकार व शरीर धारण करीत नाही. मानवांच्या मार्गदर्शनाखाली तो मानवांपैकीच एखाद्या उचित व्यक्तीची निवड करून आणि त्यांच्या मार्गदर्शनासाठी माध्यमस्वरूप आपला दूत, संदेष्टा (पैगंबर, रसूल, नबी) म्हणून नियुक्त करतो. याउलट दुसरा धर्म म्हणतो की तो संदेष्टा, दूत, महापुरुष (ऋषी) हा साकार रूपात स्वत: ईश्वरच असतो, जो मानवशरीर धारण करून पृथ्वीवर अवतार घेऊन येतो, याशिवाय अनेक इतर जीवितांचे शरीर धारण करूनसुद्धा अवतरित होतो.

* एक धर्म म्हणतो की मृत्यूनंतर स्वर्ग-नरकसुद्धा असून पुनर्जन्म व आवागमनसुद्धा आहेत. (खरे पाहाता या दोन्ही बाबीसुद्धा परस्परविरोधी आहेत.) याउलट दुसरा धर्म म्हणतो की मृत्यूनंतर (पुनर्जन्म नसून) केवळ पुनरुज्जीवन होईल. परलोकात हे पुनरुज्जीवन स्वर्गात व्यतीत होईल अथवा नरकात व्यतीत होईल.
* एक धर्म म्हणतो की समस्त मानव समान दर्जाचे आहेत. त्यांच्यापैकी कोणीही जन्मजात उच्च अथवा नीच नाही. तर दुसरा धर्म म्हणतो की मनुष्यात जन्मजात कोणी उच्च जातीचे असून काही जण नीच जातीचे आहेत. हे कधीही संपणार नाही.
* एक धर्म असे म्हणतो की त्या धर्माचा मूळ ग्रंथ शुद्ध आणि पूर्ण रूपाने ईशग्रंथ आहे, तर दुसरा धर्म म्हणतो की त्याचा ग्रंथ हा मानवनिर्मित आहे, अथवा मानवी हस्तक्षेप आणि संशोधन-परिवर्तन असलेला आहे, तरीसुद्धा तो ईशवाणी आणि ईशग्रंथच आहे. तिसरा धर्म म्हणतो की त्याच्या धर्माचा ग्रंथ हा ईशग्रंथ असण्याचे कोणतेही प्रमाण अथवा पुरावा नाही. कोणते ग्रंथ धर्माचे मूळ ग्रंथ आहेत, हेदेखील सर्वमान्य स्वरूपात निश्चित नाही. त्याचप्रमाणे वस्तुस्थिती जेव्हा अशी असेल की सर्वांमध्येच परस्परदेखील विरोधाभास असून त्यातील प्रमुख ग्रंथांतसुद्धा विरोधाभास आहे.

## समीक्षा

वर देण्यात आलेली यादी आणखीनही खूप लांबलचक होऊ शकते. मात्र थोडक्यात हे तथ्य स्पष्ट आणि निश्चित रूपाने समोर येते की इतक्या विषमता, विरोधाभास, तफावती, अंतर, फरक आणि मतभेद असूनसुद्धा सारेच धर्म कसे काय समान व सत्यधर्म असू शकतील? सारेच धर्म आपापल्या वेगवेगळ्या मार्गांवरून एकाच अंतिम लक्ष्यावर आपापल्या अनुयायांना कसे काय पोचवू शकतील? खरी आणि सत्य बाब केवळ एकच की या सर्वांपैकी फक्त एकच धर्म हा सत्यधर्म आहे.

## सत्यधर्माचा शोध

एका मोठ्या समस्येच्या विळख्यातून सुटका झाल्यानंतर किंवा एक भली मोठी अडचण संपल्यानंतर माणसासमोर केवळ एकच मार्ग उरतो आणि तो म्हणजे या गोष्टीचा शोध घेणे की सत्यधर्म कोणता आहे? मात्र सत्यधर्म शोधण्याचा नेमका आधार काय असावा! कोणत्या आधारावर शोध घेतल्यास संतोष व समाधान मिळेल? तर याचा एक आधार निश्चितच आहे जो आत्मसंतुष्टीबरोबरच बुद्धी आणि विवेकाचेसुद्धा समाधान करतो.

या जगाच्या पाठीवर चार धर्म प्रचलित आहेत. ज्यू धर्म, ख्रिस्ती धर्म, सनातन धर्म आणि इस्लाम. या सर्वच धर्मांचे आपापले धर्मग्रंथ व धर्मशास्त्र आहेत. यापैकी प्रत्येकाच्या अशा धारणा, अवधारणा आणि मान्यता जर एकत्र केल्या, ज्या सर्वसामान्य आहेत. अर्थात त्यांत परस्पर कोणतेही मतभेद, अंतर, विरोधाभास नसतील अशा धारणा व मान्यता एकत्र कराव्या. मग हे पाहावे की कोणत्या धर्मग्रंथ आणि धर्मशास्त्रात या साऱ्याच धारणा, अवधारणा आणि मान्यता समग्रतेने अशा प्रकारे आहेत की त्या धर्मातील ग्रंथात त्या सामान्य बाबींविरूद्ध

आणि विपरित कोणतीही गोष्ट नाही. त्या समान बाबी अशा आहेत.

१) 'एकेश्वरत्व'- जो विशुद्ध आहे, अर्थात ज्याच्यानुसार पूज्य उपास्य मात्र एक ईश्वर आहे. त्याच्याशिवाय अन्य कोणीही नाही, ना पूजा-उपासनेत कोणी त्याचा भागीदार आहे.

२) 'परलोकत्व'- या धारणेनुसार मृत्यूनंतर जीवन असून त्यात आपापल्या कर्मानुसार एक तर स्वर्गप्राप्ती होईल अथवा नरकात जावे लागेल.

या प्रक्रियेबरोबरच सत्यधर्माचा शोध पूर्ण होईल. या संशोधनाचा परिणाम असा समोर येईल की तो सत्यधर्म इतर दुसरा कोणताही नसून 'इस्लाम' आहे. कारण याच सामान्य बाबी इस्लामच्या मूळ धारणा असून यात या धारणांविरूद्ध कोणतीही गोष्ट नाही. हेच कारण आहे की सारेच धर्म सत्य असल्याची एक अवास्तव आणि अस्वाभाविक विचारधारा इस्लामला मुळीच मान्य नसून याच भ्रामक अवस्थेचे निवारण करताना इस्लामने केवळ स्वत:लाच सत्यधर्म असल्याचे म्हटले आहे. त्याचा हा दावा बुद्धीविवेक, तर्क आणि आधुनिक अन्वेषणाच्या कसोटीवर खरा, परिपूर्ण आणि समाधानकारक सिद्ध होतो. इस्लामचा हा दृष्टिकोन बौद्धिक व ज्ञान-विज्ञानाच्या प्रमाण व पुराव्यानुसार असून पूर्णत: तर्कसंगत व बुद्धीसंमत आहे की 'सर्वधर्मसमन्वय', 'सर्वधर्मसमभाव', 'सर्वधर्मएकता'ची विचारसरणी योग्य व उचित नसून 'धर्मांचे एकमेवत्व' हीच उचित व योग्य विचारसरणी आहे. शिवाय इतकी उचित व योग्य आहे जितकी ईश्वराचे एकमेवत्व आणि मानवजातीचे एकमेवत्व होय.

## धर्म कसा असावा?

मानवप्राणी हा शरीर आणि आत्म्याच्या समन्वयाने अस्तित्व पावत असल्यामुळे तसेच त्याच्या व्यक्तिमत्त्वात हे दोन्ही पैलू अविभाज्य असल्यामुळे धर्म असा असायला पाहिजे जो त्याच्या भौतिक, व्यावहारिक आणि आध्यात्मिक तसेच नैतिक जीवनक्षेत्रात संतुलन व सामंजस्यासहित आपली भूमिका निभावणारा असावा. (इस्लामशिवाय अन्य) धर्मांत किंवा त्या धर्माच्या अनुयायींचा इतिहास असा आढळून येतो की धर्माने पूजा-पाठ, पूजास्थळ, पूजागृह आणि काही मर्यादित धार्मिक रितींपर्यंतच आपल्या अनुयायांची साथ दिली. अथवा जास्तीतजास्त काही मानवी मूल्ये आणि काही नैतिक गुणांची शिकवण देऊन चारित्र्यनिर्मिती तसेच काही अंशी समाजसेवा वगैरेत अग्रेसर केले. यानंतर यापुढे मानवजातीच्या विशाल, वृद्ध, बहुआयामी, विविध पैलू असलेल्या बहुपक्षीय, व्यापक जीवनव्यवस्थेमध्ये धर्माने आपल्या अनुयायांची साथ सोडून दिली. हीच गोष्ट या विडंबनेचे मूळ कारण आहे. या परिस्थितीमुळे एका अशा विडंबनेने जन्म घेतला की धर्मापासून व्यवस्था पृथक झाली आणि व्यवस्थेपासून धर्म वेगळा झाला. अर्थातच धर्म वेगळा आणि व्यावहारिक कर्म वेगळे. धर्माचा व्यवस्थेशी मुळी संबंधच राहिला नाही. धर्म आणि जीवनव्यवस्था एकमेकांसमोर प्रतिद्वंद्वीच्या स्वरूपात उभे राहिले. धर्माचा आणि जीवनव्यवस्थेचा केवळ संबंधच तुटला नसून दोहोंत प्रचंड वैरभाव

आणि शत्रुत्व निर्माण झाले. दोहोंत साप-मुंगसासारखे संबंध निर्माण झाले. म्हणूनच जीवनव्यवस्थेच्या संदर्भात धर्मविमुखता, धर्मनिस्पृहता, धर्मउदासीनता, एवढेच नव्हे तर धर्मशत्रुत्वावर आधारित एका आधुनिक धर्माचा 'सेक्युलर धर्मा'च्या स्वरूपात आविष्कार करावा लागला. या नवीन धर्माने पूर्ण शक्तीनीशी अत्यंत उंच स्वरात अशी विलक्षण घोषणा केली की- या (ईश) धर्मास सार्वजनिक जीवातून (राजकारण, न्यायपालिका, कार्यपालिका, प्रशासन, अर्थव्यवस्था, शैक्षणिक व्यवस्था, तसेच समस्त प्रकारची जीवनव्यवस्था वगैरेंतून) कचऱ्यासारखे बाहेर काढून त्या ठिकाणी या नवीन व आधुनिक धर्माची अर्थात निधर्मी असलेल्या 'सेक्युलॅरिझम'ची स्थापना करण्यात यावी. कारण 'सेक्युलॅरिझम' नावाच्या या आधुनिक व्यवस्थेवर (ईशजीवनव्यवस्था असलेल्या) धर्माची छाया पडता कामा नये. आता या (ईश) धर्माच्या ठिकाणी 'सेक्युलॅरिझम'चे अधिपत्य व अधिराज्य तसेच पूर्णपणे प्रभुत्व असावे. अशा प्रकारे धर्मांच्या विभिन्नतांच्या मर्यादा आणि दुबळेपणामुळे मानवाच्या व्यक्तित्वाचे (शरीर व आत्मा हे) दोन अविभाज्य घटक विभक्त झाले. शरीर वेगळे झाले. भौतिक गरज आणि आत्मिक अथवा आध्यात्मिक गरजेच्या पूर्ततेची माध्यमे वेगळी व भिन्न झाली. अर्थात- ''व्यक्तिगत पूजा-पाठ आणि कर्मकांडात ईश्वरवादी आणि धार्मिक राहायचे तर अवश्य राहावे मात्र याबाहेर आल्यावर सामाजिक अथवा व्यावहारिक व्यवस्थेत पाऊल ठेवण्यापूर्वी ईश्वर आणि आपला धर्म घरातच ठेवावा, त्यास यामध्ये मुळीच आणता कामा नये.'' अशा स्वरूपाचे सूत्र या आधुनिक असलेल्या 'सेक्युलॅरिझम' नावाच्या धर्माचे मूलमंत्र बनले.

या शोकांतिकेचे अथवा दुर्दैवी घटना घडण्याचे जे कारण समोर आले ते सर्वांनीच भोगले. जो धर्म एक होता, तो अनेकांत विभागून त्याची शकले पडून त्यात कमालीची विषमता निर्माण झाली होती. विविध प्रकारच्या जाती, वंश, राष्ट्रीयत्व वगैरेंसारख्या विषम आणि विलक्षण गोष्टींच्या जुलमी विळख्यात धर्माची अक्षरशः मुस्कटदाबी होत होती. यामुळे धर्माचे वैशिष्ट्य असलेल्या सक्षमता, सक्रियता, प्रभावशीलता, उपकारिता, कल्याणकारिता यासारखे गुणधर्म आणि पात्रता धर्मातून नष्ट झाल्या नि धर्म दुबळा, गरीब, कमकुवत आणि दरिद्री व विषमतेच्या अन्यायी साखळदंडात कैद झाला. या कारणांवश हा ईशधर्म बाजुला सारून त्या ठिकाणी विराजमान होणारा ईश-उदासीन असलेला नवीन क्रांतिकारी धर्म (सेक्युलॅरिझम) नतमस्तक झाला, पराभूत, अपमानित झाला. मात्र याचे अत्यंत घोर व भयानक दुष्परिणाम मानवजातीस भोगावे लागले आणि आजही भोगावे लागत आहेत. सर्वत्र उपद्रव, हिंसाचार, रक्तपात, शोषण, अन्याय, अत्याचार, व्यभिचार, मद्यपान, जाळपोळ, युद्ध, बलात्कार, नरसंहार, भ्रष्टाचार, लूट, चोऱ्या, दरोडे, घोटाळे, अपहरण, नग्नता, अश्लीलता, लैंगिक अपराध आणि यासारख्या ना-ना प्रकारच्या पापांची एक भयानक त्सुनामी आलेली आहे. यावर बांधण्यात येणारा प्रत्येक बंधारा तुटून नष्ट होत असून हे महापूर बंद करण्याचे जेवढे प्रयत्न होतात, ते अपयशी ठरतात आणि हे महापूर त्सुनामीच्या स्वरूपात पहिल्यापेक्षाही जास्त आवेषाने विध्वंस माजवित पुढे जात आहे.

## इस्लामचे वैशिष्ट्य

एकाचे अनेकांत तुटून शकले पडलेल्या धर्माच्या परिणामस्वरूपी होणारा विध्वंस आपण उपरोक्त मजकुरात पाहिला. मात्र इस्लामची अशी अवस्था मुळीच नाही. वरील मजकुरात उल्लेखण्यात आलेले दुबळेपण आणि सामर्थ्यहीनता असलेल्या तसेच मर्यादा ज्या इतर धर्मांत आहेत, त्या इस्लाममध्ये मुळीच नाहीत. इस्लाम धर्माने इतर धर्मांप्रमाणे आध्यात्मिकता व धार्मिकता आणि भौतिकता व व्यावहारिकता या दोन भागांत मानवाचे आणि समाज व सामूहिक व्यवस्थेचे विभाजन कधीही केले नाही. या धर्मात प्रत्येक गोष्ट प्रत्येक विषय, प्रत्येक प्रकरण, प्रत्येक कार्य, प्रत्येक हालचाल, जीवनाचे प्रत्येक क्षेत्र वगैरे जीवनाशी संबंधित प्रत्येक बाब ईशधर्मातच सामावलेली आहे. कोणत्याही लहान-मोठ्या समस्येत मानवास एकाकी मुळीच सोडत नाही. न समाजास निराधार व नि:सहाय सोडतो न सामाजिक व्यवस्थेला वाऱ्यावर सोडतो. सर्वांचीच जबाबदारी पूर्णपणे स्वत:वर घेतो. समस्त मानवजातीचे परिपूर्ण मार्गदर्शन करण्यात, प्रत्येक क्षणी, प्रत्येक परिस्थितीत, प्रत्येक अवस्थेत आणि प्रत्येक क्षेत्रात मानवजातीबरोबर राहण्यात, साहाय्यक व सहयोगी बनण्यात तसेच त्याच्या जटिल समस्या व अडचणींचे पूर्णत: समाधान करण्यात एका ईश सत्यधर्माने जेवढे जागरूक, सतर्क, सक्षम, क्रियान्वित, तत्पर, अग्रेसर आणि पूर्णत: दक्ष असावयास हवे. इस्लाम धर्म अगदी तसाच आहे. म्हणूनच जगाच्या पाठीवरील कोणत्याही विचारवंत आणि पंडितास असे म्हणण्याचा अधिकारच नाही की 'सारे धर्म समान आहेत!'

## व्यावहारिक पुष्टीकरण

'सारेच धर्म समान रूपाने सत्य आहेत' हे फक्त बोलण्यापुरतेच नव्हे तर खरोखरच सत्य असते तर मग... धर्मपरिवर्तनावर इतकी आरडाओरड, अक्रस्ताळेपणा, रोष, क्रोध, संताप आणि तीव्र विरोध झाला नसता. एखाद्या धर्माच्या अनुयायाने आपला धर्म सोडून अन्य धर्म स्वीकारला असेल तर त्यात इतका संताप आणि विरोध होण्याचे कारण काय? ज्याअर्थी एखादी व्यक्ती धर्मपरिवर्तन करीत असेल म्हणजे सत्यधर्म सोडून दुसरा सत्यधर्मच स्वीकारीत असेल आणि प्रत्येक अवस्थेत सत्याच्याच अधीन राहत असेल तर मग यावर उग्र संताप येण्याचे आणि तळपायाची आग मस्तकाला भिडण्याचे कारण काय? यावरून केवळ एवढीच गोष्ट सिद्ध होते की 'सर्वधर्मसमभावा'चा उदोउदो करणारे लोकसुद्धा आणि सारेच धर्म सत्य असण्याचा दावा करणारे लोकदेखील हीच गोष्ट मनातून व अगदी अंत:करणातून मान्य करतात की ''सर्व धर्म समान नाहीत, सत्य नाहीत!''

या ठिकाणी एक गोष्ट स्पष्ट करणे आवश्यक आणि नितांत गरजेची वाटते की इस्लाम धर्म हा इतर सर्वच प्रचलित धर्मांत एकसमानता, समभाव आणि समन्वय वगैरेंसारख्या अस्वाभाविक आणि अनैसर्गिक भूमिकेचा अवलंब न करता सर्वच धार्मिक समुदायांत मानवता आणि मानवी मूल्यांवर आधारित सौहार्द, बंधुभाव, मानवता, सहिष्णुता, न्याय, परोपकार आणि पुण्यकर्मांत परस्पर सहकार्याची शिकवण देतो.

*नववा आक्षेप ०००*

## कुरबानी - हिंसा, हत्या, निर्दयता?

**इस्लाममध्ये मांसाहाराची शिकवण आहे. यासाठी प्राण्यांची हत्या करण्याची व त्याचे मांस मिळवून खाण्याची इस्लामने शिकवण दिली. अशा प्रकारे हिंसात्मक आणि निर्दयतापूर्ण प्राण्यांना ठार मारून त्यांचे मांस खाऊन मुस्लिमांमध्ये हिंसक प्रवृत्ती निर्माण होते. परिणामी मुस्लिम लोक इतर धर्मियांपेक्षा जास्त क्रूर, निर्दयी, निष्ठूर व हिंसकवृत्तीचे असतात. 'ईदुल अजहा' अर्थात 'बकरीद'प्रसंगी सामूहिक रूपाने जनावरे कापण्यात येतात. मुस्लिमांची निर्दयता व निष्ठूरता व्यापक रूप धारण करते आणि हजारो पशुंचा बळी मुस्लिम लोक घेतात. इस्लाम धर्म हा दयाभावाची व कृपाशीलतेची शिकवण देतो. मुस्लिमांचा अल्लाह म्हणे असीम दयावंत व कृपाळू आहे. मग मुस्लिमांत निर्दयता आणि निष्ठूरतापूर्ण ही कुरबानीची प्रथा कोणत्या दयाभाव व कृपेचे प्रतीक आहे?**

*समाधान ०००*

या विषयाला बरेच पैलू आहेत. या समस्त पैलूंवर विचार केल्यानंतरच यासंबंध आक्षेप वा गैरसमजुतीचे निवारण होईल.

### हिंसा आणि जीवहत्या

मानवतेच्या इतिहासात नेहमीच हे तथ्य पाहायला मिळते की जीवहत्या प्रत्येक काळात व प्रत्येक भागात पूर्वीपासूनच होत आली. शिवाय व्यर्थ आणि अनुचित तसेच अन्यायपूर्णरित्या हत्या करणे हे मूळ मानवी स्वभावाविरूद्ध तसेच स्वाभाविक दयाभाव आणि ममत्वविरूद्ध असल्याने लोकांनी यापासून स्वत:स दोन पावले दूरच ठेवण्याचा प्रयत्न केला, तरीदेखील इतिहासाच्या प्रत्येक चरणात प्राणीहत्या होतच राहिली. त्याचे कारण असे की विविध पैलू आणि विविध अंग असलेल्या मानवजीवनात प्राणीहत्येची नैसर्गिक गरज भासत आलेली आहे. उदाहरणार्थ- आहार, औषधी दैनंदिन लागणाऱ्या जीवनावश्यक वस्तू आणि साधने वगैरेंसारख्या सकारात्मक गरजांसाठी, तसेच रोगाची साथ फैलावण्यापासून वा रोगापासून बचाव करण्यासरख्या नकारात्मक गरजांसाठीदेखील प्राण्यांची हत्या होत गेली व अजूनही होत आहे.

पशु-पक्षी आणि मासे वगैरेंची हत्या आहाराकरिता आणि औषधनिर्मितीकरिता करण्यात येत असते. शिवाय त्यांच्या शरीराच्या प्रत्येक भाग व अवयव आणि प्रत्येक तत्त्वापासून गरजेच्या वस्तू आणि साधने तयार करण्यासाठी त्यांची हत्या करण्याची परंपरा मानवी इतिहासात पूर्वीपासूनच आहे. याशिवाय बरेच प्राणी, कीटक, डास-मच्छर, साप-विंचू वगैरेंची हत्या, शरीरस्वास्थ्यासाठी हानिकारक जीवाणूंची हत्या, त्यांच्यापासून मानवाच्या जीवितास धोका निर्माण होऊ नये म्हणून त्यांचा नाश करणे वगैरेची पूर्वीपासूनच सर्वमान्य परंपरा

इतिहासात आढळते. वर्तमानकाळात ज्ञान-विज्ञानाच्या व्यापक व सार्वभौमिक वातावरणात, औषधी विज्ञानात शोधकार्यासाठी आणि शल्यक्रिया शोध व प्रशिक्षणासाठी अनेक पशु-पक्षी, कृमीकीटक, कीटाणू, जीवाणू वगैरेंची हत्या करण्यात येते.

अगदी अशीच परिस्थिती वनस्पतीहत्येचीसुद्धा आहे. अन्न, धान्य, भाजीपाला, फुले-फळे वगैरेंचा आहार व औषधीत वापर करण्यासाठी वनस्पतींची हत्या करण्यात येते. (कारण वनस्पतीदेखील सजीवसृष्टी आहे.) वनस्पतीपासून लाकूड, अन्न, वस्त्र आणि निवारा तसेच इतर अनेक प्रकारच्या जीवनावश्यक वस्तूंची निर्मिती करण्यात येते. या सगळ्या प्रकारच्या हत्यासुद्धा जीवहत्याच आहेत. मात्र अशा प्रकारच्या हत्यांना कोणीही हिंसा, निष्ठूरता, क्रूरता आणि निर्दयतेच्या श्रेणीत सामील करीत नाही, दयाभाव आणि ममत्वाविरूद्ध असल्याचा दावा करीत नाही. काही नगण्य अपवाद वगळता (असे अपवाद मानवसमाजात नेहमीच आढळतात) सामान्यत: व्यक्ती, समाज, समुदाय, धार्मिक संप्रदाय, जाती-पाती, सभ्यता व संस्कृती, धर्म, ईशवादिता वगैरे कोणत्याही स्तरावर जीवहत्यांच्या उपरोक्त रीती आणि परंपरांचा विरोध अथवा खंडन कोणीही केलेले नाही आणि करता येणेही शक्य नाही. मोठमोठ्या धार्मिक विचारसरणी आणि संप्रदायांत अशा प्रकारच्या जीवहत्यांच्या आधारांवर ईश्वराच्या असीम दयाळू व कृपाळू होण्यावर प्रश्नचिन्ह निर्माण करण्यात मुळीच आलेले नाही, कोणत्याही प्रकारचा आक्षेप घेण्यात आलेला नाही.

## भारतीय परंपरेत जीवहत्या, मांसाहार आणि पशुबळी

सदरील विषयवस्तूवर इस्लामी दृष्टिकोन आणि मुस्लिमांच्या भूमिकेवर चर्चा करण्यापूर्वी उचित आणि आवश्यक वाटते की स्वयं भारतीय परंपरेत (निंदात्मक, नकारात्मक व दुर्भावनात्मक दृष्टी नव्हे तर) एक तथ्यात्मक दृष्टीसुद्धा टाकण्यात यावी.

मनुस्मृतीला 'भारतीय धर्मशास्त्रात सर्वोपरी शास्त्र' असण्याचे श्रेय प्राप्त आहे. याच मनुस्मृतीच्या पाचव्या अध्यायात २१ श्लोकांत मांसाहाराच्या (अर्थात जीवहत्या) संबंधी शिकवणी, नियम आणि आदेशांचा उल्लेख आहे. 'रणधीर प्रकाशन, हरिद्वार' येथून प्रकाशित, पंडित ज्वालाप्रसाद चतुर्वेदीद्वारा अनुवादित प्रती (सहावे मुद्रण, २००२) च्या ५:१७-१८, ५:२१-२२, ५:२३, ५:२७-२८, ५:२९-३०, ५:३१-३२, ५:३५-३६, ५:३७-३८, ५:३९, ५:४१-४२, ५:४३-४४, ५:५६ या श्लोकांत ही बाब आढळते. याचा सारांश असा- (१) ब्रह्माने (मानव) प्राण्यासाठी मांसल अन्न कल्पित केले आहे. अन्न, फळ, पक्षी इत्यादी प्राण्यासाठीच भोजन आहे. ब्रह्माने खाद्य आणि खादक, दोहोंची निर्मिती केली. स्वयं ब्रह्माने यज्ञांच्या समृद्धीसाठी पशु तयार केले, म्हणून यज्ञात पशुंचा वध अहिंसा आहे. (२) भक्ष्य (मांसाहारयोग्य असलेल्या) काही प्राण्यांची नावे दाखविण्यात आली आहेत आणि असे म्हटले गेले की सनातन विधी मान्य करीत संस्काराद्वारा शुद्ध करण्यात आलेले पशुचे मांसच खावे. (३) वेद-विदित आणि या चराचर जगतामध्ये नियम हिंसेला अहिंसाच समजावे, कारण धर्म वेदापासूनच निघाला आहे. (४) अगस्त्य मुनीच्या अनुपालनात बशह्मण

यज्ञाच्या निमित्ताने यज्ञ, अथवा मृत्यूच्या रक्षणार्थ प्रशस्त, पशु-पक्ष्यांचा वध केला जाऊ शकतो. मनुजींच्या कथनानुसार, मधुपर्क, ज्योतिष्टोमादि यज्ञ, पृतकर्म आणि देवकर्मात पशूहिंसा करावी. (श्रद्ध आणि मधुपर्कामध्ये तसेच) विधी नियुक्त झाल्यावर मांस न खाणारा मनुष्य मेल्यावर २१ जन्मांपर्यंत पशू असतो. (५) देवतादीच्या उद्देशाविना वृथा पशुंना मारणारा मनुष्य त्या पशुंच्या केसांच्या संख्येत सतत जन्म-जन्म मारला जातो.

यावरून असा निष्कर्ष निघतो की- १) आहारासाठी मांस खाण्यात काही गैर नाही. २) यज्ञानसाठी, श्राद्ध करण्यासाठी, देवकर्म करण्यात पशुहत्या करता येते. वस्तुत: ही हिंसा मुळीच नव्हे. ३) पशुंचा व्यर्थ वध करणे पाप आहे. ४) पशु-पक्षी आणि वनस्पती मानवाच्या आहारासाठीच निर्माण करण्यात आले आहेत.

हेच कारण आहे की (बौद्धकालीन अहिंसेच्या आंदोलनाप्रसंगी व त्यापूर्वी) वैदिक सनातन धर्मामध्ये मांसाहार आणि यज्ञासाठी प्राण्यांची हत्या करण्याची प्रथा होती. धर्माने याचा विरोध नव्हे तर समर्थनच केले. शिवाय असे करण्याचे आवाहनसुद्धा केले.

## इस्लामची भूमिका

मनुस्मृती, वेद, सनातन विधी आणि वैदिक काळातील उपरोल्लेखित संदर्भ हे मांसाहार, जीवहत्या आणि कुरबानी (पशुबळी) च्या इस्लामी भूमिकेच्या पुष्टीकरणात पुरावा व तर्काच्या स्वरूपात सादर करण्यात मुळीच आलेले नसून त्याला याची गरजदेखील नाही. कारण इस्लाम एक प्राकृतिक आणि शाश्वत धर्माच्या रूपात स्वयं पूर्णत: तर्कपूर्ण आणि विश्वसनीय आहे. वरील बाबी या मुळात मुद्दा स्पष्ट करण्यासाठी आणि समजाविण्यासाठी अशा लोकांच्या सोयी व सुविधेकरिता लिहिण्यात आल्या आहेत जे कोणास ठाऊक कशासाठी प्रत्येक स्तरावर मांसाहार आणि जीवहत्या तर नजरेआड करतात. एवढेच नव्हे तर त्यांच्यापैकी बरेचजण स्वत: (मोठ्या छंदाने व चवीने) मांस-मासे, अंडी वगैरेंचा मनसोक्त फडशा पाडतात. मात्र विलक्षण आणि आश्चर्याची गोष्ट अशी की याच संदर्भात ते इस्लाम आणि मुस्लिमांवर क्षुब्ध आणि चिंतित होऊन आगपाखड करीत असतात. यासंबंधी इस्लामचा दृष्टिकोन थोडक्यात असा आहे- (१) भूमंडल, वायूमंडल, सौरमंडलातील प्रत्येक (जीव-अजीव, चराचर) वस्तू मनुष्याच्या सेवा/ आहार/ उपभोग/ स्वास्थ्य/ जीवनासाठीच निर्माण करण्यात आली आहे. (२) कोणत्याही प्राण्याची/ जीविताची व्यर्थ आणि विनाउद्देशाने केली जाणारी हत्या ही अवैध असून सउद्देश हत्या वैध आहे.

## मुस्लिमांची भूमिका

कुरबानी म्हणजेच बलिदान होय. ईशमार्गात यथावकाश आवश्यकता पडल्यास आपल्या सर्वस्वाची कुरबानी म्हणजेच बलिदान करण्याच्या भावनेचे व्यावहारिक प्रतीक आहे. जवळपास चार हजार वर्षांपूर्वी आदरणीय इब्राहीम (अ.) यांची अल्लाहने ईशपरायणतेची परीक्षा घेण्यासाठी असा आदेश दिला होता की आपली सर्वांत जास्त प्रिय वस्तू म्हणजेच वृद्धापकाळात झालेला पुत्र आदरणीय इस्माईल (अ.) यांचा बळी द्यावा. आदरणीय इब्राहीम

(अ.) यांनी अल्लाहच्या आदेशाचे पालन करण्यासाठी आपल्या अत्यंत प्रिय व लाडक्या मुलाच्या मानेवर सुरी ठेवताच ईशवाणी झाली, ''बस्स! आता पुरे झाले! तुम्ही परीक्षेत सफल झालात. मुलाचा बळी अभिष्ट नसल्याने त्या ठिकाणी (मुलाच्या बळीच्या प्रतिदानस्वरूपात) एका मेंढ्याचा बळी द्यावा, एवढे पुरेसे आहे.'' (सारांश-कुरआन: ३७:१०१-१०७)

अगदी या प्रसंगापासून आजपर्यंत त्याच तिथीला (जिलहज या अरबी महिन्याच्या १० तारखेला) पशुबळी देऊन मुस्लिम समाजाचे (कुरबानी देण्यास समर्थ असलेले) सगळेजण प्रतीकात्मक ईश्वराशी आपले संबंध, ईशपरायणता आणि संकल्पाचे नूतनीकरण करतात आणि यातून असा दृढसंकल्प करतात, ''हे ईश्वरा! तुझा आदेश होताच आणि आवश्यकता पडताच आम्ही तुझ्याकरिता आपली प्रत्येक वस्तू बलिदान करण्यास सदैव तयार आणि तत्पर आहोत.'' आणि हीच ईशपरायणतेची चरमसीमा आहे.

## मुस्लिमांची हिंसक प्रवृत्ती (?)

म्हणे मांसाहार आणि प्राण्यांच्या हत्येमुळे मुस्लिमांची प्रवृत्ती हिंसक होते. मात्र या गोष्टीत तथ्य किती आहे आणि इस्लाम व मुस्लिमांविरूद्ध द्वेष निर्माण करण्याचा किती कुटिल डाव आहे, हे आपल्याला गतकाळाच्या इतिहासावरून आणि वर्तमान परिस्थितीवरूनसुद्धा स्पष्ट दिसते. या जगाच्या पाठीवर जवळपास २५ टक्के आणि भारतात मागील ६३ वर्षांपासून आजपर्यंत असलेली मुस्लिम लोकसंख्या १५ टक्क्यांच्या घरात आहे. या काळात दोन महायुद्धे आणि इतरही अनेक युद्धे झाली. मात्र या सर्वच युद्धांमध्ये मुस्लिमांचा अगदी सहभागसुद्धा नाही. शिवाय इतर तीन युद्धांत केवळ दोन ते पाच टक्केच मुस्लिमांचा सहभाग होता. याशिवाय भारतात आजपर्यंतच्या हजारोंच्या संख्येत झालेल्या दंगलीत दोन टक्केच सहभाग आहे. कित्येक नरसंहार भारतात झाले. मात्र यात मुस्लिमांचा अगदीच शून्य वाटा आहे. आपल्या देशात पूर्व ते दक्षिणपर्यंत आणि अतिदक्षिण भागातील हिंद महासागरातील एका लहानशा देशात मागील बऱ्याच काळापासून सुसंघटित आणि सशस्त्र तसेच सुनियोजित संघटनाद्वारे होत असलेल्या अमानुष हिंसाचारात लाखो निर्दोष लोक ठार करण्यात आले, वस्त्याच्या वस्त्या जाळून खाक करण्यात आल्या. यापैकी कोणीही मुस्लिम गट नाही. एवढेच नव्हे तर राष्ट्रपिता गांधीजी आणि दोन पंतप्रधानांची हत्या करणारे मुस्लिम नव्हते हे लक्षणीय होय. ज्यांची सत्य जाणून घेण्याची इच्छा व निर्णय घेण्याची प्रवृत्ती असते, त्यांना या मुस्लिमद्वेषामागील राजकारण समजण्यास मुळीच उशीर लागणार नाही.

## खरे हिंसाचारी कोण?

हिंसाचार, मानवतेचा नरसंहार, रक्तपात आणि जाळपोळ व यासारख्या अमानुष, निष्ठूर आणि मानवतेच्या तोंडास काळीमा फासणाऱ्या दुष्कृत्यांमध्ये अगदी राक्षसांनाही मागे सोडणाऱ्या प्रवृत्ती असणारे कोण आहेत? हजारो निष्पापांना आणि अगदी लहान मुले, स्त्रिया आणि वृद्धांनासुद्धा निर्दयीपणे ठार करणारे हिंसाचारी कोण आहेत? निरपराधांना जीवंत जाळणारे आणि स्त्रियांचे गर्भ फाडून त्यातील अर्भके ठार करणारे कोण आहेत? गर्भाशय

फाडून त्यातील निष्पाप व कोणाचेही काही वाईट न केलेल्या अजाण अर्भकांच्या पोटात भाले टोचून तांडव नृत्य करणारे कोण आहेत? हे सर्वांनाच माहीत आहे की हे जगाच्या पाठीवरील सर्वांत जास्त निष्ठूरतापूर्ण दुष्कृत्ये मांसाहारी मुस्लिमांची नाहीत.

जगाच्या आजपर्यंतच्या इतिहासात दुष्कर्म करण्याचे उदाहरण असे सापडत नाही. पशु-पक्षी आणि कृमी-कीटक तसेच डास-मच्छरांप्रती दयाभावाचा उदोउदो करणाऱ्यांनी महिलांना घराबाहेर ओढावे, भरचौकात त्यांचा बलात्कार करण्यात यावा, द्रौपदीचे वस्त्रहरण करावे तसे त्यांची वस्त्रे काढून भर रस्त्यावर पूर्णनग्न धिंड काढावी, त्यांच्या परिवार व इतर लोकांसमोर तिच्या शरीराचे लचके तोडण्यात यावे, पूर्णनग्न धिंड काढून चित्रफीत तयार करण्यात यावी आणि या दुष्कर्मावर 'गर्व से कहो!'चा नारा लावण्यात यावा! अशा प्रकारच्या जगातील मानवतेच्या इतिहासामधील सर्वांत जस्त हिंसक कुकृत्याचे श्रेय कोणी लाटले? निरपराध आणि निष्पाप अबालवृद्धांच्या रक्ताने शिमगा कोणी खेळला? निरपराधांची शरीरे जाळून होळी कोणी खेळली? अशी उदाहरणे मुस्लिमांनी कायम केलेली नाहीत. मुस्लिमांचा मानवतावाद, प्रामाणिकता आणि दयाभाव तसेच त्यांचा विवेक आणि संयमी प्रवृत्ती अशा अमानवी कुकृत्यांसाठी कधीही परवानगी देत नाही. उलट असे कुकर्म तथाकथित अहिंसावाद्यांनी व देशभक्तांनीच आपल्या देशाच्या धरतीवर सुरू करण्याचा गौरवपूर्ण इतिहास रचला आणि वारंवार रचला!

*दहावा आक्षेप ०००*

## इस्लामी शिक्षा - क्रूरता व निर्दयता?

**इस्लामने विविध अपराधास्तव ठरविलेल्या शिक्षा अतिभयंकर, अमानवी, निष्ठूर व निर्दयी स्वरूपाच्या आहेत. जग किती प्रगत झाले आहे. आजच्या सभ्यतेमध्ये जुनाट आणि अंधकारमय काळातल्या हात कापण्याच्या, कोरडे ओढण्याच्या, जिवे मारण्याच्या आणि यासारख्या इतर शिक्षांचे काय औचित्य आहे? खरे तर हे व्यक्तिगत मानवाधिकार पायदळी तुडविणे होय.**

*समाधान ०००*

इस्लामी शरियतने (कायद्याने) दिलेल्या ज्या शिक्षा क्रूर आणि मानवाधिकारांची पायमल्ली करणाऱ्या असल्याचा बोभाटा करण्यात येतो, त्या खालीलप्रमाणे आहेत.

१) चोरीची शिक्षा हात कापणे.

२) व्यभिचार, बलात्काराची शिक्षा कोरडे मारणे अथवा मृत्यूदंड देणे. (अपराधाच्या गांभीर्यानुसार)

३) व्यभिचाराचा (अथवा बलात्काराचा) खोटा आरोप ठेवणाऱ्यास (आणि हा आरोप दोन साक्षीदारांद्वारे सिद्ध न करता आल्यास) कोरडे मारण्याची शिक्षा.

४) हत्या करणाऱ्यास मृत्यूदंडाची शिक्षा.

इस्लामने नव्हे तर आपणच स्वत: रचलेल्या या सेक्युलर, निधर्मी, ईश्वरहीन समाजात नैतिकता आणि ईशपरायणता डोके आपटून आपटून आक्रोश करीत आहे; तिला घराबाहेर काढून तिच्या ठिकाणी रखैलीप्रमाणे भौतिकता, स्वैराचारवाद, स्वच्छंदवाद, अनैतिकता वगैरे आणून ठेवण्यात आल्या आहेत. यामुळे आपल्याला इस्लामने निश्चित केलेल्या शिक्षा अमानवी, निष्ठूर व निर्दयतापूर्ण असल्याचे वाटते. अशा या स्वैर अभिलाषा आणि चंगळवादाच्या मागे पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणे धावणाऱ्या संस्कृतीच्या समाजात उपरोक्त प्रकारच्या सक्तीच्या शिक्षा लागू होणारसुद्धा नाहीत. कारण इस्लाम सर्वप्रथम 'एक ईश्वर केंद्रित आणि परलोकमुखी समाज आणि संस्कृती'ची निर्मिती करतो. अशा समाज-संस्कृतीमध्ये अथवा सामूहिक व्यवस्थेमध्ये चोरी, बलात्कार, व्यभिचार, खून, हत्या, रक्तपात, दरोडे, उपद्रव, भ्रष्टाचार, घोटाळे, अपहरण, ब्लॅकमेलिंग, रॅगिंग आणि यासारख्या इतरही कोणत्याही प्रकारच्या अपराधांना मुळीच वाव नसतो. कारण इस्लामी प्रशिक्षणच असे आहे की त्यात ईशपरायणता, परलोकी उत्तरदायित्वाची जबाबदारी, ईमान आणि ईश्वरावरील दृढ भावनेचे अतूट अंग असलेली लाज-लज्जा व यासारख्या बाबींमुळे त्याचप्रमाणे संभाव्य अपराधांची ही ईहलोकी शिक्षापद्धत लागू असल्यामुळेसुद्धा अशा अन्यायी व अत्याचारी अपराध व पापकर्मांची मानसिकताच समाजातून नष्ट पावते. उलट या समाज व संस्कृतीमध्ये प्रत्येक अपराध व अन्यायाविरूद्ध क्षोभ आणि राग तसेच द्वेष व घृणा निर्माण होते. हे सर्व काही असूनसुद्धा यदाकदाचित

कोणाकडून उपरोल्लेखित गुन्हा घडलाच तर इस्लाम यापासून असा निष्कर्ष काढतो की ही गुन्हेगार व्यक्ती समाजाच्या शरीरावरील कॅन्सरचे विष आहे. जर हे विषारी फोड नष्ट करण्यात आले नाही तर पूर्ण समाजाच्या अस्तित्वालाच नष्ट करील. समाजाचे नैतिक स्वास्थ्य बाधित होईल, नीतीमत्ता आणि मानवहित संपून जाईल. अशा प्रकारे इस्लामने अशा एक अथवा काही कॅन्सरच्या विषारी फोडांना समाजरूपी शरीरापासून दूर करण्यासाठी शल्यचिकित्सेप्रमाणे कठोर शिक्षा देण्याचा कायदा केला आहे.

## चोरीची शिक्षा

इस्लामी राज्य हे वस्तुत: एक कल्याणकारी राज्य असते. (सेक्युलर डेमॉक्रेटिक राज्यांप्रमाणे कल्याणकारितेचा सुंदर मुखवटा चढवून कोट्यवधी निर्धन, गरीब, दरिद्री आणि उपजीविकेपासून वंचित लोकांना दोन वेळची खळगी भरण्यापासून वंचित करणाऱ्या, औषधांवाचून त्यांच्या प्राणांचा बळी घेणाऱ्या, शेतकरी व मजुरांना आत्महत्या करायला लावणाऱ्या, लक्षावधी स्त्रियांचे लैंगिक शोषण करणाऱ्या व समाजाचे सर्वांगी शोषण करणाऱ्या, नेते व गुंडप्रवृत्तीच्या हाती मानवतेची धिंड काढणाऱ्या, 'बळी तो कान पिळी' आणि 'ज्याचा दांडा त्याची म्हैस'सारखी अवस्था असणाऱ्या राज्यासारखी अवस्था इस्लामी राज्याची नसते.) इस्लामी राज्य हे पूर्णपणे कल्याणकारी राज्य असून यामध्ये शासनाची पूर्णत: जबाबदारी असते की प्रत्येक नागरिकाला मूलभूत जीवनावश्यक संसाधनांपासून वंचित राहाण्याची नामुष्की पत्करावी लागत नसून त्याच्या संपूर्ण गरजा आणि अधिकारांची पूर्ण सन्मानाने पूर्तता करण्यात येते. त्याच्या सामाजिक, भावनिक, श्रद्धात्मक आणि भौतिक गरजांची त्यास कधीही मुळीच कमतरता भासू नये अशीच पूर्ण व्यवस्था असते. यामुळे कोणालाही चोरीचकारी व दरोडा टाकण्याची पाळीच येत नाही. एवढे सर्व काही असूनही जर कोणी चोरी व दरोड्यासारखा अपराध केलाच तर इस्लामने त्याच्यावर हा कडक कायदा लागू करताना कुरआनात स्पष्ट केले की,

"चोर हा पुरुष असो की स्त्री, त्याचे हात कापावे. हा त्याच्या (अपराधी) कमाईचा बदला (प्रायश्चित्त) आहे आणि अल्लाहकडून शिक्षाप्रद दंड आहे." (कुरआन-५:३८)

(पहिल्यांदा चोरी केल्यास उजवा हात आणि दुसऱ्यांदा चोरी केल्यास डावा हात कापण्याची शिक्षा देण्यात आलेली आहे.)

आदरणीय पैगंबर मुहम्मद (स.) यांचे दुसरे उत्तराधिकारी असलेले इस्लामी शासनप्रमुख माननीय उमर (रजि.) (यांच्या बाबतीत गांधीजी एकदा म्हणाले होते की, "शासनव्यवस्था असावी तर माननीय उमर (रजि.) याच्या शासनव्यवस्थेसारखी!") यांच्या शासनकाळात एकदा भयंकर दुष्काळ पडला. अशा अवस्थेत एका व्यक्तीने विवश होऊन चोरी केली. यावर मात्र माननीय उमर (रजि.) यांनी अस्थायी रूपात हात कापण्याची शिक्षा स्थगित केली. अर्थातच चोराचे हात कापण्याची शिक्षा सामान्य असलेल्या आर्थिक परिस्थितीत आहे. यामुळे समाजास अशांती आणि उपद्रवापासून मुक्ती तर मिळालीच शिवाय प्रशासन व्यवस्था आणि न्यायव्यवस्थेवरील मोठा भार नष्ट झाला.

## व्यभिचार / बलात्काराची शिक्षा

इस्लामने पडदा पद्धतीद्वारे आणि विरुद्धलिंगीच्या बिनधास्त, अनियंत्रित, स्वच्छंद मेलमिलाफावर वा संबंधांवर अंकुश लावून व्यभिचार (सहमतीने होणारे लैंगिक अपराध) आणि बलात्कार व ब्लॅकमेलिंगसारख्या अपराधांचा मार्ग कायमचा बंद केला. इस्लामी विवाह व्यवस्था आणि पारिवारिक व्यवस्था लागू करून मानवाच्या अर्थात स्त्री-पुरुष दोघांच्या भावनिक व शारीरिक गरजा पूर्ण केल्या. शिवाय ईशपरायणता आणि अल्लाहवरील ईमानचाच एक भाग असलेल्या लाज-शरमेची अंत:करणात पवित्र भावना निर्माण करून व पारलौकिक जीवनातील उत्तरदायित्वाची भावना निर्माण करून आपल्या अनुयायांच्या मनात नग्नता, अश्लीलता, स्वैराचार व कोणत्याही प्रकारच्या लैंगिक अपराधांविषयी तीव्र तिरस्कार आणि घृणा निर्माण केली व अशा अपराधी मानसिकतेचा समूळ नायनाट केला. एवढे असूनसुद्धा एखाद्या पुरुष अथवा महिलेने असा अपराध केलाच तर याचा अर्थ असा की हा अपराधी मनुष्य नसून शैतान आहे. म्हणून त्यास कठोर शिक्षा देऊन समाजाला अशा अनैतिक व शैतानी विळख्यातून मुक्ती दिली व या अपराधाच्या परिणामस्वरूपी उद्‌भवणाऱ्या उपद्रवाच्या वादळापासून पूर्णपणे रक्षण केले. कुरआनात म्हटले आहे की,

''व्यभिचारीणी स्त्री आणि व्यभिचारी पुरुष दोघांना प्रत्येकी शंभर कोरडे मारा आणि त्यांच्यावर दया निर्माण होण्याची भावना अल्लाहच्या धर्माविषयी तुम्हाला छळता कामा नये, जर तुम्ही अल्लाह आणि अंतिम निवाड्याच्या दिवसावर ईमान बाळगत असाल. आणि त्यांना शिक्षा देतानाच्या प्रसंगी ईमानधारकांचा (मुस्लिमांचा) एक समूह तेथे उपस्थित असावा. (जेणेकरून समाजात जर अपराधी तत्त्व असतील तर त्यांना असे दुष्कर्म करण्याचे धारिष्ट्य होऊ नये.)''

(कुरआन-२४:२)

वर्तमान सेक्युलर कायद्यामध्ये परस्पर सहमतीने व्यभिचार करणे व लैंगिक संबंध प्रस्थापित करणे हा शिक्षापात्र गुन्हा ठरत नाही. एवढेच नव्हे तर विलक्षण आणि शोचनीय व दुर्दैवी बाब अशी की या प्रकारच्या व्यभिचाराला 'वैयक्तिक स्वातंत्र्य' आणि 'मानवाधिकार' अशी विलोभनीय संबोधने देण्यात आली आहेत. या ठिकाणी साधा एवढाही विचार करण्याची तसदी घेण्यात आलेली नाही की ससहमती आणि आपसातील राजीमर्जीने होणारे हे दुष्कर्म पुढे चालून बलात्कारासारख्या अपराधाचे भयानक स्वरूप घेऊनच पूर्णविराम घेते. इस्लामने हा मूर्खपणा करण्याचा प्रश्नच येत नाही. एवढे मात्र निश्चित की इस्लामने या गोष्टीवर पूर्णपणे ध्यान दिले की अविवाहित स्त्री-पुरुषांना मात्र इतकी कडक शिक्षा व्यभिचारास्तव दिली नाही. त्यांना फक्त ऐंशी कोरडे मारून सोडून देण्यात आले. कारण लैंगिक अपराध हा विवाहित स्त्री-पुरुषांनी केला आणि अविवाहित स्त्री-पुरुषांनी केला तर दोघांमध्ये फरक असतो. अविवाहित स्त्री-पुरुषांच्या लैंगिक भावना विवाहितांच्या तुलनेत जास्त असतात आणि म्हणूनच त्यांची मानसिकता लक्षात घेऊन इस्लामने अविवाहितांना विवाहितांएवढी कडक शिक्षा न देता ऐंशी कोरडे मारण्याचीच शिक्षा सुनावली. शिवाय विवाहित असूनही म्हणजेच लैंगिक गरजा पूर्ण होत असूनही व्यभिचार वा बलात्कार करणाऱ्यांना दगडांचा वर्षाव करून ठार

मारण्याची शिक्षा इस्लामने ठोठावली आहे.

## व्यभिचार, बलात्काराच्या असिद्ध आरोपाची शिक्षा

सन्मान आणि प्रतिष्ठा ही मानवाची अमूल्य संपत्ती आहे, मानवाचे सुंदर अलंकार आहे, याशी मानवाचे जीवाभावाचे नाते आहे. याला क्षती पोचल्यास मानवाला जगणे नकोसे वाटते. सुंदर व विलोभनीय नंदनवनसुद्धा त्यास नरकाग्नी वाटू लागते. विशेषत: नाजुक आणि हळवा स्वभाव असलेल्या स्त्रिया याबाबतीत खूपच भावूक असतात. काहीही न करता त्यांच्या शीलतेवर कोणी अपराधाचे शिंतोडे उडविण्याचा प्रयत्न केल्यास त्यांना सहन होत नाही आणि कधीकधी याच असह्यतेस बळी पडून त्या आत्महत्यासुद्धा करतात. म्हणूनच इस्लामच्या दृष्टीत चारित्र्यहनन आणि कोणत्याही प्रकारे एखाद्यास हकनाक बदनाम करणे इस्लामने महापाप ठरविले आहे. विशेषत: शीलवान स्त्री-पुरुषांवर खोटा आरोप लावणे तर भयानक अपराध आहे. कुरआनात म्हटले आहे,

"जे लोक मर्यादाशील स्त्रियांवर आळ घेत असतील मग चार साक्षीदार घेऊन येत नसतील, त्यांना ऐंशी फटके मारा आणि त्यांच्या साक्षी कधी स्वीकारू नका, आणि ते स्वत:च अवज्ञाकारी आहेत. त्या लोकांव्यतिरिक्त जे या कृतीनंतर पश्चात्ताप करतील व सुधारणा घडवून आणतील कारण की अल्लाह अवश्य (त्यांच्या बाबतीत) क्षमाशील व परम दयाळू आहे." (कुरआन-२४:४-५)

## हकनाक (अनुचित) हत्या करण्याची शिक्षा

सेक्युलर कायदा-व्यवस्थेत मानवाधिकाराच्या तार्किक आधारावर (काही अतिविशेष प्रकरणे वगळता साधारणत:) हत्या अथवा खुनाच्या अपराधास्तव मृत्यूदंडाची शिक्षा देण्याचे प्रावधान नाही. सेक्युलर कायदा-प्रणालीचा हा कायदा मुळात मोठा विचित्र आणि विलक्षण आहे. खून करणाऱ्या अपराध्याच्या प्रति खूपच सहानुभूती आणि कनवळा व दयापूर्ण व्यवहार करण्याचे समर्थन या कायद्यात आहे. मात्र निष्पाप आणि निरपराधाच्या प्राणाचा बळी गेला, त्याच्याविषयी, त्याच्या अनाथ झालेल्या मुलांविषयी, त्याच्या निराधार व निराश्रित झालेल्या विधवा पत्नीविषयी कोणत्याही प्रकारची सहानुभूती या मानवाधिकाराचे पोवाडे गाणाऱ्या सेक्युलर कायद्याला दिसत नाही. निष्ठूर आणि निर्दयी खुन्याशी सहानुभूती दाखविणाऱ्या या सेक्युलर कायद्याला याचा विचार येत नाही की त्या निष्पापांच्या हत्येमुळे त्याच्या परिवारजनांच्या मानवाधिकारांची आणि न्यायाची कशी नग्न धिंड निघत आहे. त्याच्या परिवारजनांच्या स्वप्नांची व आशांची कशी राखरांगोळी होत आहे, त्याचा परिवार कसा उघडा व निराधार होत आहे आणि त्यावर काळाचा किती निर्दयी घाव पडत आहे. निरपराधाच्या प्राणाचा बळी घेणारा हाच खुनी काही दिवस जेलमध्ये राहून बाहेर येईल आणि जीवनाची चटक मटक मौज करीत राहील. मात्र त्या खून झालेल्या परिवारास कायमस्वरूपी दु:ख, ग्लानी, पीडा, वैधव्याचे चटके, अनाथपणाची असह्य झळ आणि काही बाबतीत विध्वंस, विवशता आणि ना-ना प्रकारच्या सामाजिक आर्थिक शोषणाची आग झेलण्यासाठी वाऱ्यावर सोडून देण्यात येते.

आपले काहीही वाकडे होत नाही अशी मानसिकता असलेल्या मस्तावलेल्या लोकांत खून व हत्या करण्याची मानसिकता बळावते, लोकांच्या जीवाशी खेळण्याची मानसिकता निर्धास्तपणे बळावते. परिणामी प्रतिवर्ष हजारो हत्या होतात आणि हजारो परिवार उद्ध्वस्त होतात. अशा प्रकरणांचा असामान्य भार न्यायव्यवस्थेवर पडतो. हा खेळ येथेच संपत नाही. खुन्याविरूद्ध प्रतिशोध आणि बदल्याची भावना आग ओकत राहते. परिणामी खुन्यांचेही खून होतात, मुडदे पडतात. वैर, प्रतिशोध, सूडभावना आणि शत्रुत्वामुळे समाजात अशांती आणि उपद्रव माजतो. समाज प्रदूषित होतो, वातावरण गढूळ होते.

अशी परिस्थिती निर्माण होऊन शांती भंग होऊ नये, अन्याय व अत्याचाराचे नग्न तांडव माजू नये यासाठी वेळीच खबरदारीचा उपाय म्हणून इस्लामची ही तजवीज निश्चितच मानवजातीवर उपकार होय. कुरआनात म्हटले आहे,

"हे ईमानधारकानो, हत्येच्या बाबतीत तुमच्यासाठी हत्यादंडाचा आदेश नियत केला आहे. स्वतंत्र व्यक्तीने हत्या केली असेल तर त्या स्वतंत्र व्यक्तीस आणि गुलामाने हत्या केली असेल तर गुलामास मारले जावे आणि स्त्रीने हत्या केली असेल तर त्या स्त्रीची हत्या करावी. परंतु जर खूनी व्यक्तीच्या सोबत मृत व्यक्तीचा भाऊ जर क्षमेची वागणूक करू इच्छित असेल तर सर्वसामान्य नियमानुसार हत्यादंडाचा निर्णय घेतला जावा. खूनी व्यक्तीने चांगल्या प्रकारे अर्थदंड दिला पाहिजे. ही तुमच्या पालनकर्त्याकडून दिलेली मुभा आणि दया आहे. या उपर देखील जे अतिरेक करतील त्याच्यासाठी दुःखदायक यातना आहेत. हे ज्ञानीजनहो, मृत्युदंडामध्ये (समाजाच्या सुरक्षिततेचे) जीवन आहे. आशा आहे की या कायद्याचे भंग करण्यापासून तुम्ही स्वतःला वाचवाल." (२:१७८-१७९)

इस्लामने खून वा हत्या करण्याची शिक्षा मृत्यूदंड अथवा हत्याप्रतिदान राशी ठरवून असे स्पष्ट केले की मानवजातीकरिता यातच जीवन आहे. कारण यामुळेच यापुढे खून, हत्या आणि रक्तपात होणार नाही आणि सर्वांचे रक्षण होईल. म्हणून या शिक्षेला क्रूरता आणि निर्दयीपणा म्हणणे सर्रास चुकीचे व अविवेकी होय.

-०- समाप्त -०-